






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)
महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






## अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक ( जानेवारी, मार्च, जून, ऑक्टोबर )
**संपादन समिती :** अशोक रा. केळकर ( प्रमुख ), कल्याण काळे, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** ए–२ परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११००४ (दूरध्वनी ५९२५८)
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, १।८ आगरकर नगर, पुणे ४११ ००१ ( फोन ६३४९६, शिवाय फोन ५४०६९ )
**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.
**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच असे नाही.
या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अनुदान मिळालेले आहे.

---

**संपादक :** अशोक रा. केळकर / **प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी प्र. ना. परांजपे / **मुद्रणस्थळ :** संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

संपादकीय

# मराठी वृत्तपत्रे आणि इंग्रजीची ताबेदारी

भारतीय भाषांतील पत्रकारितेचा बऱ्याच वेळा 'भाषांतरी पत्रकारिता' असा अधिक्षेप करण्यात येतो. या भाषांतील वृत्तपत्रांना स्थानिक आणि काही प्रमाणात प्रादेशिक बातम्या वगळता इतर सर्व बातम्या वृत्तसंस्थांकडून घ्याव्या लागतात. वृत्तसंस्थांचे वृत्तसंकलन आणि वृत्तवितरण इंग्रजीतून चालते. (गेल्या दोन तीन वर्षांत ते हिंदीतूनही होऊ लागले आहे) त्यामुळे प्रादेशिक भाषांतील वृत्तपत्रांत काम करणाऱ्या उपसंपादकांचे मुख्य काम भाषांतर करणे हेच असते. पहिल्या वृत्तपत्र आयोगापुढे निवेदन करताना चिरस्मृत नानासाहेब परुळेकरांनी " माझ्या हाताखाली पत्रकार नव्हेत तर भाषांतरकार काम करतात " असा दावा केला होता ! उपसंपादकाची नेमणूक करताना आजही त्याला सुबोध आणि अचूक भाषांतर वेगाने करता येते की नाही हाच मुख्य निकष असतो. बातम्याखेरीजच्या संपादकीय मजकुरासाठी—अग्रलेख, वृत्तलेख, टिपणे इत्यादीसाठी—लागणारी माहिती इंग्रजीतच उपलब्ध असते. त्यामुळे इंग्रजी पत्रकारितेच्या तुलनेने भारतीय भाषांतील पत्रकारिता दुय्यम किंवा गौण मानण्याची अपरिहार्य प्रवृत्ती दिसते.

वृत्तसंस्थांनी बातम्या इंग्रजीतून देण्याऐवजी प्रादेशिक भाषांतून दिल्या तर शेकडो उपसंपादकांचा भाषांतर करण्यात व्यर्थ जाणारा वेळ वाचेल. वाचकांना अधिक विस्तृत, ताज्या, आणि निर्दोष बातम्या वाचायला मिळतील. वाचलेल्या वेळाचा सदुपयोग करुन उपसंपादक, सहसंपादक इत्यादींना आपला व्यासंग वाढवता येईल. त्यामुळे भारतीय भाषांतील पत्रकारिता अधिक सखोल आणि कसदार होऊ शकेल आणि त्यामुळे तिचे गौणत्व संपून तिला इंग्रजीच्या बरोबरीचे स्थान मिळवता येईल.

भारतीय भाषांतून बातम्या देण्यात वृत्तसंस्थांना येणारे अडथळे कोणते ?

काहींना असे वाटते की हे अडथळे मुख्यतः तांत्रिक आहेत. उदाहरणार्थ, दूरमुद्रकावर भारतीय भाषांच्या विविध लिपी बसविण्यात आलेल्या नाहीत. पण हा अडथळा वाटतो तितका दुर्लंघ्य नाही. दूरमुद्रकावर देवनागरी लिपी बसविण्यात आली आहे आणि इतर लिप्या बसविणे फारसे दुष्कर नाही. शिवाय, रोमन लिपीतून प्रादेशिक भाषांतील मजकुराची देवाणघेवाण चालत आलेली आहेच. आता तर उपग्रह, व्हिडिओ टर्मिनल्स इत्यादींच्यामुळे लिपीचा प्रश्न अगदीच गैरलागू ठरणार आहे.

खरी अडचण आहे ती आर्थिक पाठबळाची. प्रादेशिक भाषा-केंद्रावर भाषांतरकार नेमून सगळ्या वृत्तपत्रांना त्या भाषेतच बातम्या पुरविणे, त्या प्रदेशातील बातम्या त्या

त्या भाषेतच गोळा करून वितरित करणे आणि त्यातील राष्ट्रीय महत्त्वाच्या बातम्या इंग्रजीत भाषांतरित करून दिल्लीला पाठवणे यासाठी लागणारा खर्च वृत्तसंस्थांनी कसा भरून काढायचा ? वृत्तपत्रांनी दिलेल्या वार्षिक वर्गणीवरच वृत्तसंस्थांचा कारभार चालतो. हिंदीतून बातम्या घेणारी पुरेशी वृत्तपत्रे वर्गणीदार व्हायला तयार झाल्यामुळेच हिंदीतून वृत्तसेवा देणे वृत्तसंस्थांना शक्य झाले. मराठीतून वृत्तसेवा घेण्यास पुरेशी वृत्तपत्रे तयार नाहीत ही यातली खरी अडचण आहे. महाराष्ट्र शासनाच्या विविध कचेऱ्या आणि मराठी वृत्तपत्रे पुरेशा संख्येने पुढे आली तर वृत्तसंस्थांकडून वृत्तसेवा मिळवणे अवघड नाही.

मराठीच्या विकासासाठी कटिबद्ध असलेले महाराष्ट्र शासन आणि मराठी वृत्तपत्रे यांनी प्रादेशिक भाषेतील वृत्तसेवेकडे इतके दुर्लक्ष का करावे ?

**प्र. ना. परांजपे**

**वैज्ञानिकाचे वेळापत्रक**

सोमवारी, बुधवारी, आणि शुक्रवारी जेवढे काही वेडपट विचार वाटतील त्यांची दखल घेतो. मंगळवारी, गुरुवारी, आणि शनिवारी ते खोडून काढण्याचा प्रयत्न करतो.

**नील्स बोर,** विख्यात डेनिश भौतिकीविद्

प्रकाशकिरण हा कणाकणांनी बनला आहे असा न्यूटनचा समज होता. एकोणिसाव्या शतकात प्रकाशकिरण हा लहरी किंवा तरंग या स्वरूपाचा आहे असे मानावे लागले. विसाव्या शतकात पुन्हा हा वाद उफाळून आला. त्या काळातला एक उद्‌गार—

सोमवारी, बुधवारी, आणि शुक्रवारी आम्ही प्रकाश लहरीरूप मानतो. आणि मंगळवारी, गुरुवारी आणि शनिवारी आम्ही प्रकाश कणरूप मानतो.

# आवाज-जोपासना आणि नाट्यात्म भाषण

अशोक दा. रानडे

[ श्री. अशोक दा. रानडे हे एक श्रेष्ठ संगीतज्ञ म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांचे संगीत-विषयक लेखन सर्वांना जितके सुपरिचित आहे तितके त्यांचे नाट्यविषयक लेखन सर्व-ज्ञात नाही. पण त्यांचा त्याही क्षेत्रातील व्यासंग मोठा आहे. **भाषा आणि जीवन** वरील लोभातून त्यांनी ' नाट्यात्म भाषण ' या विषयावरील एक लेखमालाच पत्रिकेसाठी लिहिण्याचे मान्य केले आणि तत्परतेने ते लेख आमच्याकडे पाठवले. या लेखमालेतील पहिला लेख आम्ही येथे प्रसिद्ध करत आहोत. यापुढील लेख ' भाषा आणि जीवन 'च्या पुढील अंकातून क्रमशः प्रसिद्ध होतील. नाट्यानुभव असणाऱ्या वाचकांनी आपल्या प्रतिक्रिया अवश्य पाठवाव्या. –संपादक ]

## प्रास्ताविक

इतर व्यवसायांप्रमाणे व तितक्याच प्रमाणांत कलाक्षेत्रही आज स्पर्धात्मक व अटी-तटीचे बनले आहे. एक प्रमुख परिणाम असा की महत्त्वाकांक्षी संगीतकारास, नर्तकास, वा अभिनेत्यास आपापल्या क्षेत्रात पदार्पण करण्यापूर्वी आवश्यक साधनेद्वारा जरूर ती कौशल्ये हस्तगत करता आल्यास उपकारक ठरते. व्यवसायात बरेच लवकर पाऊल टाकून व्यवसाय करता करता शिकण्याची सोय आज उपलब्ध नाही. व्यावसायिक यश मिळविणे आणि मिळाल्यावर ते टिकविणे यासाठी जरूर ती धडपड करण्यात शक्ती व वेळ खर्च करावा लागतो. शिवाय हौशी ' कलाकारांना ' मिळणाऱ्या उदार पसंतीवर व्याव-सायिकांना दावा सांगता येत नाही. या बदलत्या परिस्थितीमुळे व्यवसायात पडण्यापूर्वी पुरे करता येतील असे प्रमाणित अभ्यासक्रम प्रयोगजीवी कलांसाठी असावेत ही गोष्ट तत्त्व म्हणून मान्य झाली आहे. नाट्याचे शिक्षण देता येते, त्याकरिता अभ्यासक्रम बनविता येतात आणि त्यातून काही निश्चित सुधारणा घडू शकते याची जाणीव वाढत्या प्रमाणात होत आहे. (खरे पाहता मराठी रंगभूमीच्या इतिहासाच्या अर्वाचीन कालांतही प्रस्तुत जाणीव तीव्रपणे झाली होती. श्री. अ. वा. बर्वे यांनी **नाट्यबोध** (१९२२) लिहिले. त्यांनीच १९०२ मधे नाट्यशिक्षणाचा अभ्यासक्रम आखला होता. सोळा महिन्यांच्या एकूण अभ्यासक्रमात त्यांनी सहा महिने वाचिक अभिनयाला दिले होते!) आज





अनुक्रमणिका

शासकीय व इतर प्रेरणांतून सिद्ध होणारी नाट्यशिक्षणशिबिरे प्रस्तुत जाणीवेचाच पुरावा होत.

## उद्दिष्टे

विद्यापीठीय संदर्भ नसलेल्या, प्रयोग व व्यवसाय जवळचे मानणाऱ्या शिक्षणाचे उद्दिष्ट काय असते? विशिष्ट कलेची तात्त्विक पार्श्वभूमी, साधनेत वापरले जाणारे व्यायाम, आविष्काराच्या पद्धती वगैरेंना शास्त्रोक्त पाया द्यावा; शिक्षण–प्रयत्न–प्रयोग यांची तर्कपूत सांगड घालावी; अभ्यासक्रमाच्या पूर्तीने काही निश्चित कौशल्ये हस्तगत करण्यास पोषक वातावरण निर्माण करावे ही उद्दिष्टे होत. अभ्यासक्रम पुरा केल्यामुळे कलावंत तयार होतात असा कोणाचाच भ्रम नसतो. परंतु संबंधित क्षेत्राची एकूण चौकट आणि विशिष्ट कौशल्यांचा नेमका नकाशा कळण्याइतपत मजल पोचू शकते.

नाट्यशिक्षणाच्या आयोजनात दुर्दैवाने भाषण हे अंग जुजबीपणे हाताळलेले दिसते. आवाजाची फेक, त्याचा लगाव, भाषणांतील स्पष्टास्पष्टता, वापरलेल्या आवाजांच्या जाती इत्यादी बाबतीत जाणकारीने प्रयत्न केलेला दिसत नाही. शास्त्रीय दृष्टीचा अभाव दिसतो इतकेच नव्हे तर भारतीय परंपरा, वैज्ञानिक पार्श्वभूमी, आणि प्रत्यक्ष प्रयोगाचा सतत संदर्भ यांकडेही पाठ फिरवलेली दिसते. नाट्यात्म भाषणाचा म्हणूनच नव्याने विचार व्हायला हवा. आणि अधिक नेमकेपणे बोलायचे तर असे म्हणता येईल की आवाज– जोपासना आणि नाट्यात्म भाषण या सर्वसाधारण शीर्षकाखाली तीन विषयांचा विचार व्हावा. ' भाषणातील नाट्यात्मता ', ' नाट्यात्म भाषण व आवाज– जोपासना ', आणि ' नाट्यात्म भाषणाचे शिक्षण ' असे ते तीन विषय होत.

## भाषणातील नाट्यात्मता

प्रस्तुत चर्चेच्या आवाक्यासंबंधी एक स्पष्टीकरण दिले पाहिजे. प्रवचन, पुराण, पुढाऱ्यांची व्यासपीठीय व्याख्याने याचा विवेचनात अंतर्भाव नाही. प्रवचनादी भाषण प्रकारात नाट्यात्मता नाही असा अर्थातच अभिप्राय नाही. नाटकातल्या नाट्यात्मतेवर लक्ष केंद्रित करण्याचा हेतू असल्याकारणाने प्रवचनादींच्या नाट्यात्मतेची तीव्रता व अपरिहार्यता कमी असते याचेही भान ठेवले पाहिजे. नाट्यात्मतेचीं नाटकबाह्य आविष्करणे आपण विचारात घेत नसलो तरी नाट्यात्मतेचे मूलस्वरूप तपासताना परिघावरच्या प्रवचनादी आविष्कारांना स्पर्श होईलच.

ध्यानात घेण्यासारखी आणखी एक बाब आहे. संगीतादी इतर प्रयोगकला आणि ललित कलांच्या संदर्भातही एक कलास्वरूपतत्त्व म्हणून नाट्यात्मतेचा आढळ होत असतो. नाट्यात्मतेचे हे सौंदर्यशास्त्रीय अंगही आपण विचारात घेणार नाही. सौंदर्यशास्त्रीय दृष्ट्या अयशस्वी असूनही आविष्कारांतली नाट्यात्मता सिद्ध होऊ शकते हे

ध्यानात ठेवले पाहिजे. कोणती नाट्यात्मता सौंदर्यपूर्ण या प्रश्नास आपण हात लावणार नाही. आपल्या दृष्टीने पाहता दोन प्रश्न प्रस्तुत आहेत. खुद्द नाट्यविष्कारातल्या भाषणाचे स्वरूप काय असते ? अशा भाषणांत आढळणाऱ्या नाट्यात्मतेचे कारण काय ?

## मराठी रंगभूमीचा संदर्भ

संपूर्ण विवेचनासाठी मराठी रंगभूमीचा ( आणि काटेकोरपणे बोलावयाचे तर रंगमंच-परंपरेचा) संदर्भ ठेवला आहे. माझा वैयक्तिक परिचय जास्तकरुन याच परंपरेशी आहे हे एक कारण झाले. शिवाय असे की मराठी रंगमंच-परंपरेची अर्वाचीन आवृत्तीसुद्धा जवळ जवळ दीडएकशे वर्षांची आहे. म्हणजे नाट्यात्म भाषणाच्या काही परंपरा महाराष्ट्रात स्वाभाविकपणे आकाराला आल्या आहेत इतकेच नव्हे तर दृढही झाल्या आहेत. नाट्यात्मतेची स्वरूपनिश्चिती करण्याकरिता एका जिवंत परंपरेची पुण्याई उपकारक ठरेल. दुसरे असे की, एकंदर मौखिक परंपरेचा पाया महाराष्ट्रात व्यापक आणि मजबूत आहे. शास्त्रोक्त कंठसंगीत, लोककला, आणि रंगमंच-परंपरा यांचे मौखिक परंपरेशी असलेले नाते पाहता प्रस्तुत विवेचनास महाराष्ट्रसंदर्भ उपकारक ठरतो याविषयी शंका नसावी. नाट्येतर क्षेत्रांतली मौखिक परंपरासुद्धा वाचिक प्रश्नांना सामोरी जात असल्याचा फायदा नाट्यक्षेत्रालाही मिळणे तर्कसंगत आहे. के. नारायण काळे यांनी म्हटल्याप्रमाणे महाराष्ट्रातील रंगभूमी मराठी रंगमंचपरंपरेपेक्षा जुनी आहे. वाक्-शक्तीचे नाट्यात्म आविष्कार तपासताना नाट्येतर आविष्कारांबरोबर त्यांची देवाण-घेवाण प्रभावी ठरली असा प्रत्यय येत असतो. कीर्तन, पुराण, प्रवचन, तमाशा, भारूड, इत्यादींचे संचित मराठी रंगमंच-परंपरेने भाषणाबाबत(ही) राबविले असल्याकारणाने नाट्यात्म भाषणाची मराठी धारा विवेचनाच्या ठामपणास आधार देईल. तिसरे कारण असे की रंगकलासंबद्ध शोधांचा वा नवतेचा स्वीकार वा धिक्कार करण्याकरिता भाषा व भाषण यांचा निरपवाद उल्लेख करण्याची घटना मराठी रंगजगतात घडली आहे. नाट्याशी संबंधित अनेक कार्यांचा भाषण हा संदर्भबिंदू ठरला आहे. नाट्यात्म भाषणाच्या विवेचनासाठी मराठी रंगमंच-परंपरेचा संदर्भ मुख्यतः ठेवण्यामागची पार्श्वभूमी ही अशी आहे.

## नाटक : एक संयोगी कलाविष्कार

नाट्य ही एक संयोगी कला असून तिचा नाटक हा आविष्कारही संयोगी म्हणून सिद्ध होतो. वेगवेगळेपणे आविष्कृत केल्या जाऊ शकतील आणि तरीही कला पदवीला पोचू शकतील अशा अनेक कलांची संगमभूमी म्हणजे नाटक. संयोगीपणाचे सर्व फायदे-तोटे नाटकाच्या बाबतीत अनुभवाला येतात. आपापल्या आवाहकतेचे संचित बरोबर घेऊन येणारे कलाविष्कार नाटकाला अधिक प्रभावी करू शकतात- हा फायदा सहजपणे

लक्षात येईल. पण याच्या उलटही घडू शकते ! आपापली सामर्थ्ये घेऊन येणारे कलाविष्कार नीटपणे, तोलातोलाने न वापरल्यास एकाच्या परिणामकारकतेस दुसऱ्याचा प्रभाव मारक ठरण्याचा धोकाही संभवतो. थोडक्यात नाटक सर्वांनाच आव्हान देत असते.

भारतीय व पाश्चात्त्य परंपरांनी नाट्याच्या संयोगित्वाची आवर्जून दखल घेतली आहे. भरत आणि ॲरिस्टॉटल यांना अनुक्रमे भारतीय व पाश्चात्त्य परंपरांचे प्रतिनिधी मानल्यास त्यांची साक्ष प्रस्तुत ठरेल.

नाट्यास पंचम वेद मानून ऋग्वेदापासून वाङ्मय, यजुर्वेदापासून अभिनय, सामवेदापासून गीत, व अथर्ववेदापासून रसभाव नाट्यवेदाने घेतले असे भरत म्हणतो.[१] ॲरिस्टॉटलच्या बाबतीत परिस्थिती थोडीशी वेगळी आहे. त्याच्या भूमिकेनुसार नाट्य आणि विशेषतः दुःखान्तिका म्हणजे काव्य असून त्याचे सहा बाह्य व सहा अंतर्वर्ती, गुणसंबद्ध घटक असतात. कथानकरचना, चरित्ररेखाटन, आणि विचार अंतर्वर्ती घटक असून गीत व भाषा बाह्यघटकात मोडतात असे त्याचे विवेचन आहे.[२] ध्यानात घेण्यासारखी गोष्ट अशी की नाट्य ही संयोगी कला आहे असे भरत स्पष्टपणे नमूद करतो पण ॲरिस्टॉटल मात्र सुखात्मिका व दुःखात्मिका यांचे निर्देश ताल, धून, आणि छंद यापैकी एक वा अनेक तत्त्वे वापरणाऱ्या कला असा करतो. मुद्दा असा की नाट्याचे स्वरूप काय आणि त्यांत भाषण-भाषा-द्वयीचें नेमके स्थान कोणते या प्रश्नांबाबत दोघांच्या भूमिकेत भेद दिसतो. भरताच्या तुलनेने पाहता ॲरिस्टॉटलने भाषण, भाषा, गीत यांना परिघावरचे स्थान दिले आहे अशी शंका येते. भारतीय परंपरेतील नाट्यात्म भाषणाचा ऊहापोह करताना कदाचित ही बाब अर्थपूर्ण ठरेल.

याशिवाय आणखी एक वेधक घटना अशी की आधुनिक पाश्चात्त्य नाट्यविचारवंतांनी अत्यंत आग्रहाने ज्या सुधारणा सुचविल्या त्यात मुख्य अशी की, संहिता बाजूस सारून भाषण व गीत यावर भर देणारी रंगभूमी अस्तित्वात यावी. अपाया, क्रेग, आर्तो, मेयरहोल्ड इत्यादी अनेकांच्या विवेचनात हा भर दिसतो. ॲरिस्टॉटलला जी नाट्यांगे बाह्य वाटली त्यांना केंद्रस्थानी आणणारा नाट्यविचार आशियाई रंगभूमीपासून प्रेरणा घेणारा असावा ही घटना अर्थपूर्ण होय.

कोणताही आविष्कार संयोगी असला तरीही कलापदवीस पोचू शकतो. याविषयी गॉर्डन क्रेगने मात्र स्पष्ट मतभेद नोंदवला आहे.[३] त्याचा आग्रह असा की कोणतीही कला एका एकसंध प्रतिभेचाच आविष्कार असावी. त्याशिवाय आविष्कार कलापदवीपर्यंत पोचणे अशक्य असा त्याचा दावा आहे. एकाच वेळी लेखक, अभिनेता, चित्रकार इत्यादी अनेकांच्या अमलाखाली असलेली रंगभूमी स्वतःची भाषा बनवू शकत नाही. आणि अशा भाषेविना कलापदवीची कल्पनाही करवत नाही. प्रस्तुत आपत्तीवर क्रेगने काही उपाय सुचविले आहेत. क्रेगच्या शिफारशींनुसार दिग्दर्शक सार्वभौम व लेखक वैकल्पिक असावा. अभिनेत्यांनी मुखवटे वा कळसूत्री बाहुल्यांशी साधर्म्य राखावे आणि

मूकाभिनय व स्वरांचा चढउतार यावर भर ठेवावा.[४] क्रेगला जैविक एकात्मतेचा एक विशिष्ट अर्थ अभिप्रेत होता आणि तत्कालीन पाश्चात्त्य रंगभूमिपरंपरेला प्रतिक्रियात्मक व काहीसा निदानीचा प्रतिसाद त्याने नोंदवला हे स्पष्ट आहे.

प्रसिद्ध नाट्यतत्त्वविद् के. नारायण काळे यांनी क्रेगच्या मुद्द्याला अप्रत्यक्षतः उत्तर दिले आहे. काळ्यांचे म्हणणे असे की, नाट्यकलेत दोन प्रकारचे अंतर्विरोध असतात. पहिल्या प्रकारचा अंतर्विरोध अभिनय, हालचाल, पात्ररचना यांसारख्या नाट्यांगांच्या परस्परसंबंधांतला. नाट्यसंहितेची परिणामकारकता आणि नाट्यप्रयोगाची स्वतःची अशी खास परिणामकारकता यामधील अंतर्विरोध दुसरा. काळ्यांचे प्रतिपादन असे की स्तानिस्लाव्हस्कीसारख्या उपपत्तिकारांच्या कार्यामुळे प्रस्तुत अंतर्विरोध नाहीसे होण्याची शक्यता निर्माण होते.[५] परिणामी नाट्याविष्काराचे स्वरूप नाट्यघटकांचे मिश्रण असे न राहता त्यास कलात्मता प्राप्त होते. घटकांचे मिश्रण व त्यांचा संयोग यात क्रेग घोटाळा करत होता असे वाटल्यास नवल नाही.

## भाषण : महत्त्वाचा नाट्यात्म घटक

नाट्याचे संयोगी स्वरूप स्पष्ट करताना भरत आणि ॲरिस्टॉटल यांच्यात भेद असला आणि त्यास धरूनच त्यांच्या एकंदर नाट्यदृष्टीत फरक असला तरी नाट्याचे संयोगित्व आज मान्य झालेले घटित आहे. माझा विचार मात्र भाषण या एकाच नाट्यघटकापुरता मर्यादित आहे.

पठण, गीत, वाचिक अभिनय ही भरतोक्त अंगे वा ॲरिस्टॉटलप्रणीत गीत व भाषा यांचे वापर या सर्वांमधे वाणीचे आविष्कार समोर येत असतात. नाट्यात्म भाषण म्हणजे वाणीचा प्रमुख व नाट्यांतर्गत उपयोग होत.

भाषण म्हणजे काय? आवाज अधिक भाषा म्हणजे भाषण होय. भाषेविना व स्वतंत्र असे आवाजाचे अर्थपूर्ण वापर शक्य आहेत. रडणे, हसणे, मोठ्याने जांभई देणे, सुस्कारणे, कण्हणे, कुंथणे, हुंकार देणे इत्यादी आवाजाचे अनेक वापर अभाषिक असतात. त्यांची अर्थपूर्णता वादातीत आहे. भाऊबंदकी नाटकात केशवराव दात्यांनी म्हाळसेच्या भूमिकेत सोडलेला सुस्कारा किती अर्थपूर्ण होता याचे पु. रा. लेल्यांनी नेमके वर्णन केले आहे.[६] विचारान्ती असे आढळते की अनेक वेळा भावनिक तीव्रतेच्या क्षणी आविष्कारसाधन म्हणून भाषा लंगडी पडते. अशा प्रसंगी आवाज हेच साधन उपयोगी पडत असते. आशयवहनाच्या उत्कट क्षणी भाषेऐवजी वाणी व भाषणाऐवजी मानवी आवाज यांची कास धरावी लागते असा निष्कर्ष काढल्यास फारसे वावगे होणार नाही. आधुनिक म्हटल्या जाणाऱ्या नाट्याविष्कारांत अ-भाषिक आविष्कार मार्गांचा वापर करण्यावर अधिकाधिक भर का राहतो याचा उलगडा भाषेच्या दुबळेपणाच्या जाणीवेत आहे.








अनुक्रमणिका

## नाट्यांतर्गत भाषणप्रकार

आतापर्यंत रेखलेल्या पार्श्वभूमीवर नाट्यात वापरले जाणारे भाषणाचे प्रकार तपासावयाचे आहेत. विविध भाषणप्रकार तपासल्यामुळे नाट्यात्मतेचे प्रमाण कमीजास्त कसे असू शकते ते चांगले ध्यानात येईल. शिवाय नाट्यात्म म्हणजे काय या मूलभूत प्रश्नाचे उत्तर शोधण्यातही मदत होईल, व आवाज-जोपासना आणि नाटकाचा प्रयोग यांमधील प्रत्यक्ष संबंध स्पष्ट होईल.

एकंदर विचारक्रमावरून निःसंदिग्धपणे असे दिसेल की हा विचारविषय केवळ औपपत्तिक नाही. मराठी नाट्यविचार आणि विशेषतः नाट्यसमीक्षा प्रत्यक्ष प्रयोगाशी आंतरिक नाते राखत नाही. परिणामतः त्यांचे स्वरूप विलक्षण पुस्तकी होते. खेदाची गोष्ट अशी की या कारणाने नाट्याविष्कार ज्यांच्यामुळे सिद्ध होतो ते कलावंत नाट्यविचार वा नाट्यविचारक यांपासून दूर जातात. कलावंतांच्या प्रत्यक्ष अनुभवाचा फायदा नाट्यविचार समृद्ध करण्यासाठी घेतला जात नाही. प्रयोगसिद्ध कलाविष्कार व संबंधित कलावंत एका बाजूस तर कलाविचार व कलाविचारवंत दुसरीकडे असे चित्र दिसते! प्रस्तुत आपत्ती टाळावयाची तर औपपत्तिक विचार व विचारवंत यांचे प्रत्यक्ष प्रयोगाशी जीवंत नाते राखणे गरजेचे आहे. नाट्याविष्कारातील भाषणप्रकारांचे स्वरूप आधी तपासून मग त्यांचे आवाज-जोपासनाशास्त्रांतील सिद्धांताशी नाते कसे आहे ते तपासणे उपकारक आहे. नाहीपेक्षा नाट्यात्म भाषणाची चर्चा हां हां म्हणता शैलीविषयक पुस्तकी विचारात बुडून जाईल.

## नाट्यात्म भाषणांचे वर्गीकरण

नाट्यात्म भाषणांचे वर्गीकरण वेगवेगळ्या निकषांद्वारा शक्य आहे. परंतु प्रत्यक्ष वापराकडे कान वळवायचा ठरविल्यास तीन प्रमुख वर्ग कल्पिता येतात. याकरिता वापरावयाचे निकष पुढीलप्रमाणे नोंदता येतील: १ उद्देशित व्यक्ती, २ भाषांतर्गत मोडणी, ३ आवाजाचे गुणधर्म. प्रस्तुत निकष वापरून नाट्यात्म भाषणांचे वर्गीकरण साधतांना सरमिसळ होईलही. पण तरीही वर्गीकरणांच्या उपयुक्ततेस फारसा बाध येत नाही. खेरीज तिन्ही वर्गीकरणांत एक तार्किक सुसंगतीही प्रतीत झाली आहे. नाट्यात्म भाषणाचा उगम कोणत्या व्यक्तींत आहे व ते कोणाकडे पोचावयाचे आहे हे तपासणे हा पहिला निकष होय. तसे पाहता लेखकाच्या कृतीतून संहिता सिद्ध होण्यापूर्वीच प्रस्तुत वर्गीकरण अस्तित्वात येते. भाषांतर्गत मोडणी हा निकष वापरून हाती लागणारे दुसरे वर्गीकरण अनिवार्य, कारण बहुतांशी नाट्यात्म आशय शब्दांकित होणे जरूरीचे असते. अभिनेत्यांनी केलेला आवाजाचा वापर आणि आवाजाच्या लगावातून प्रतीत होणारे त्याचे गुणधर्म तिसरे वर्गीकरण सिद्ध करतात. लेखकाला अभिप्रेत असलेला अमूर्त आशय, आणि त्याला सशरीर करणारी नाट्यात्म भाषणे दोहोंना अभिनेत्याचा आश्रय घ्यावा लागतो हे

उघड आहे. सारांश तिन्ही वर्गीकरणांतून समोर ठाकणाऱ्या खटाटोपाचा एक अंतिम उद्देश असतो आणि तो म्हणजे श्रोते- प्रेक्षकांवर असर करणे. अंतिम परिणामावर आधारित चौथे वर्गीकरणही मांडता येईल, पण नाट्यात्म भाषणाच्या विवेचनात अंतिम परिणामाचा विचार गुंतविणे शिवधनुष्य पेलण्यासारखे आहे. कारण श्रोते-प्रेक्षकांवर होणारा परिणाम जोखण्याकरिता स्वतंत्र व बऱ्याच गुंतागुंतीचा संकल्पना-व्यूह मांडायला हवा, वेगळेपणे आणि समग्रतेने.

## पहिले वर्गीकरण : उद्देशित व्यक्ती

नाट्यात्म भाषण कधीही दिशाहीन असू शकत नाही. ते एक वा अनेक पात्रांत उगम पावून एक वा अनेक पात्रांकडे जात असते. भाषणांचा प्रवास दिशाहीन होऊ नये यासाठी उगमस्थान व उद्दिष्ट स्थान याविषयीच्या पुरेशा सूचना देण्याचे काम नाटककाराला दक्षतेने पार पाडावयाचे असते. नाट्यात्म भाषणाच्या वाटचालीचे प्रमुख मार्ग पुढीलप्रमाणे नोंदता येतील :

### (१) संभाषण

दोन व्यक्तींना एका वेळेस जोडणारा सर्वसामान्य शब्दव्यापार म्हणजे संभाषण होय. संभाषणात भाग घेणाऱ्यांचे प्रतिसाद काही खास गुणवत्तेचे असतातच असे नाही. संभाषणांतील शब्दांचे वापर अनेकदा व्यक्तींच्या आजूबाजूनेच जात राहतात ! कल्पना-भावना विचारांना काहीशा एकाकीपणे का होईना वाचा फोडणे असेही त्याचे स्वरूप असते. इत्यर्थ असा की संभाषणातील भाषणाचा निर्माता हमखास गुंतलेला आढळला तरी ग्राहक गुंतेलच असे नाही. (उदाहरणार्थ, अनेक वेळा संभाषणाविषयी पुढील प्रकारची रंगसूचना दिली जाते; 'आणि संभाषण करीत प्रवेश करतात; अर्थात् 'एकपात्री' संभाषणाचे हे अगदी ढोबळ उदाहरण झाले.) दुसऱ्याशी संबंध स्थापन करण्याबाबत संभाषण नेहमीच यशस्वी ठरेल असे नाही; पण तरीही नाट्यात्म भाषणाच्या इतर प्रकारांना पायाभूत होऊ शकेल इतक्या प्रचुर प्रमाणात त्याचा वापर व आढळ दैनंदिन जीवनात होत असतो.

### (२) संवाद

निश्चित आशय आणि दिशा असलेले, दोन पात्रांच्या दरम्यान सिद्ध होणारे भाषण म्हणजे संवाद. संभाषणापेक्षा संवाद अधिक सदिश व सहेतुक असतात. नाट्य व नाट्य-विचारात संवादाला इतके महत्त्व लाभलेले आहे की, संवादांचा वापर करणाऱ्या नाट्येतर साहित्यप्रकारांचे वर्णनही सहजपणे नाट्यात्म असे केलेले आढळेल.

संवादाचे एक महत्त्वाचे लक्षण असे की, अर्थहीन संवादातही आशय असू शकतो आणि वरवर पाहता अर्थपूर्ण वाटणारे संभाषण मात्र आशयहीन असू शकते ! कारण









अनुक्रमणिका

असे की, संवादाला अधिक निश्चित दिशा असते इतकेच नव्हे तर त्यामागे एक दबाव आणि आग्रह असतो. संभाषण दोन व्यक्तींना जोडू पाहते तर संवाद दोन **पात्रांना** बांधू पाहतो. केवळ **असण्यामुळेही** संवाद परिणाम साधतो, कारण दैनंदिन जीवनात भाषारूप न लाभणाऱ्या अनेक बाबींना संवादात भाषारूप लाभते.

**( ३ ) अनेकपात्रसंवाद**

प्रस्तुत भाषणप्रकाराची घडण संवादसमान परिस्थितीत होते पण यात संपर्कक्रियेच्या रेषा थोड्या अस्पष्ट असतात. नावात सुचविल्याप्रमाणे या भाषणप्रकारात एकाच वेळी अनेक पात्रे बोलतात. प्रत्येक पात्राच्या भाषणाची नाट्यात्मता आणि परिणामसंबद्ध प्रभावशक्ती अर्थातच कमी-अधिक तीव्रतेची राहते. अनेकपात्रसंवादात भाषिक आणि आवाजाशी संबंधित सामग्रीची रचना एखाद्या वाद्यवृंदरचनेइतकी काळजीपूर्वक करावी लागते. भाग घेणाऱ्या पात्रांचे प्रयत्न अधिक सुसूत्र असावे लागतात. रेल्वेचे थांबे, बाजार, सभास्थाने इत्यादी ठिकाणी अनेकपात्रसंवाद घडू शकतो. नाट्यात्मतेची बीजे त्यात असतात. मात्र प्रयोगासाठी तो खूपच आखीवरेखीव करावा लागतो. **एकच प्याला** मधील ' आर्य मदिरा मंडळ ' प्रवेश अनेक पात्रसंवादाचे उदाहरण होय.

अनेकपात्र संवादाविषयीची एक महत्त्वाची घटना स्तानिस्लावस्कीच्या ' आंसांब्ल ' अभिनयाला मिळालेल्या अमेरिकी प्रतिसादात नोंदलेली सापडते. **झार फ्योदर** च्या प्रयोगाने प्रभावित झालेल्या न्यूयॉर्क टाईम्सच्या समीक्षकाने आपण पाहिलेल्या खेळात ' eloquent vocal colouring of the kaleidoscopic crowd ' आढळल्याचा आनंद व्यक्त केला, इतकेच नव्हे तर समान परिस्थितीत ' आपल्याकडे एक आरडा-ओरडा 'च ऐकू येतो याची लाजिरवाणी खंत नोंदली.[७]

इथे प्रस्तुत पण सहसा ध्यानात न येणारी गोष्ट अशी की रंगभूमीवर पदार्थ, वस्तू, वा भौतिक पिंडांची रचना करणे जितके सुलभ तितकेच आवाजांची रचना करणे अवघड आहे. कारण असे की भौतिक पदार्थ डोळ्याला दिसतात, स्पर्शाला जाणवतात, मूर्त असतात, इतकेच नव्हे तर अवकाशात एका जागी एका वेळी एकच वस्तू ठेवता येते. याउलट आवाज कानाला जाणवतात, अमूर्त असतात, आणि कालिक पातळीवर एकाच वेळी अनेक अवतरू शकतात. परिणामतः त्यांची रचना अवघड जाते. दिग्दर्शकाचे कान आणि नटांचे आवाज याकरिता चांगल्याच तयारीचे असावे लागतात.

आज जमावाची भूमिका असलेले आविष्कार सादर करण्याकडे वाढती प्रवृत्ती आहे. तेव्हा अनेकपात्रसंवादाचे महत्त्व निर्विवाद होय. अनेकपात्रसंवाद आज पर्यंत का याची कारणे अनेक असू शकतील. उदाहरणार्थ, एकल भाषणे जास्त असणे नाट्याच्या लोकशाहीकरणास विरोधी वाटत असेल. सुप्रसिद्ध अमेरिका–अभ्यासक व विचारवंत अलेक्सिस द तोकविल याने एके ठिकाणी प्रस्तुत संदर्भात वेधक भूमिका घेतली आहे. त्याच्या

एका महत्त्वाच्या विधानाचा आशय असा की, लोकशाहीचे सर्व भले-बुरे गुणधर्म प्रथमतः नाट्यात दिसू लागतात ![८] दुसरी शक्यता अशी की सर्वांना भाग घेता येण्यासारखा आविष्कारमार्ग धुंडाळता यावा इतकेच नव्हे तर धर्मविधींची तीव्रताही त्यास लाभावी असे वाटत असावे. कारणे काहीही असोत, अनेकपात्रसंवाद दिग्दर्शक व नट यांना आव्हानकारी ठरतात हे नक्की.

## (४) स्वगते

पात्राने स्वतःकडेच परावर्तित केलेले भाषण म्हणजे स्वगत. नाट्याविष्काराच्या दृष्टीने स्वगताचे महत्त्व विशेष मानले गेले आहे. नाट्य आणि साहित्य यांच्या अभ्यासकांना स्वगते अवतरण-मूल्याची वाटतात हे खरेच पण त्याहीपेक्षा अर्थपूर्ण बाब अशी की व्यक्तिगत अभिनयकौशल्य सिद्ध करण्याच्या दृष्टीने पाहता स्वगतासारखे साधन नाही असे अभिनेत्यांना वाटत आले आहे. मराठी संगीत नाटकाच्या सुवर्णयुगात तर गद्य नटांना असे वाटे की संगीत नटांना जशी पदे तशी आपल्याला स्वगते होत. स्वगते नसली तर नट नाखूष होत. आपल्याला स्वगते नाहीत याबद्दल पोतनीसांनी तक्रार केल्यामुळे कोल्हटकरांनी मुळात नसलेली स्वगते **वधूपरीक्षा** नाटकात लिहिली.[९] स्वगताच्या परिणामकारकतेचा एक उलटा पुरावा पण आहे. **सरलादेवी** या नाटकात केशवराव दात्यांचा अभिनय इतका चांगला होई की, लेखक वासुदेवराव भोळ्यांनी आपण होऊन मुळात लिहिलेले स्वगत काढून टाकले ! चांगला अभिनय व स्वगत यांना तुल्य मानल्याचा हा पुरावा वेधक म्हटला पाहिजे. श्री. रा. ब. मराठे यांनी १८७२ मध्ये याच संदर्भात एक वेधक तक्रार केली आहे. **मनोरमा** आणि **स्वैरकेशा** या नाटकांत स्वगते फार झाली आहेत. नाटकात गोष्टी घडवाव्यात, बोलवून त्या कमी ठसतात असा त्यांचा अभिप्राय आहे.[१०] स्वगतांमुळे गोष्टी घडविण्यात खंड पडतो असे मराठ्यांच्या टीकेतून सूचित होत असले तरी नाटककारांना भाषणप्रकार म्हणून स्वगते प्रिय होत हेही स्पष्ट दिसते. नाट्यतत्त्वविद् के. नारायण काळे यांनी स्वगतांच्या सामर्थ्यावर निराळाच प्रकाश टाकला आहे. ते म्हणतात की पुरेशी प्रकाशयोजना व त्यासाठी आवश्यक तांत्रिक सोयी नसल्याकारणाने स्वगते जरूरीची ठरत आणि प्रेक्षकांना ती सहन करणे भाग पडे ! याउलट दमदार आवाज आणि भाषणाची कुशल फेक यासाठी नाव कमावलेल्या नानासाहेब फाटकांसारख्या नटाची साक्ष वेगळी आहे. स्वगते कमी होत चालल्याबद्दल त्यांनी खंत व्यक्त केली असून समर्थ आवाज व तो फेकण्याचे कसब असल्यास स्वगते निश्चितपणे परिणामकारी ठरतात असा त्यांचा दावा आहे.[११] (पर्यायाने अर्वाचीन काळीसुद्धा स्वगतांच्या नाट्यात्मतेस बाधा पोचलेली नाही असा याचा अर्थ निघाला.) मतामतांच्या 'गलबल्या'तून निष्कर्ष निघतो तो असा की, नाट्याविष्कारसंबद्ध सर्व मंडळींना स्वगताविषयी तात्त्विक भूमिका व व्यावहारिक आग्रह

धरण्याइतका स्वगतांचा वापर आणि वावर, सार्वत्रिक आणि सार्वकालिक राहिला आहे. प्रत्यक्ष वापर व उपयोजन हाच प्रस्तुत विवेचनाचा पाया असल्याकारणाने स्वगतांचा विचार करणे अत्यावश्यक आहे.

### ( ५ ) एकपात्री भाषण

एकाच पात्रात उगम असलेला दुसरा भाषणप्रकार एकपात्री भाषण. स्वगत व एकपात्री भाषण यांत फरक असा की, एकपात्री भाषणांत हजर नसलेल्या पात्राचे/पात्रांचे प्रतिसादही अंतर्भूत असतात. मुख्यतः आत्माविष्कारास उद्युक्त झालेल्या पात्राचा उद्‌गार म्हणजे स्वगत. अंतर्मुख व्यक्तिमत्त्वाचा आविष्कारमार्ग म्हणजे स्वगत. उलटपक्षी एकपात्री भाषणात एकच पात्र बोलते होत असले तरी दुसऱ्या पात्राची उपस्थिती जाणवत असते. टेलिफोनवरचे भाषण एकपात्री भाषणाचे काहीसे निराळे उदाहरण होऊ शकेल. नाटयेतर साहित्यप्रकाराच्या लेखकांनी प्रस्तुत भाषणप्रकाराचा वापर केल्याची उदाहरणे मशहूर आहेत. एकपात्री भाषण ही एक द्विदिश प्रक्रिया आहे तर स्वगत वर्तुळाकृती. दोहोंच्या विशिष्ट लक्षणांमुळे त्यांच्याशी संबंधित आवाजांचे गुणधर्म इत्यादींवरही परिणाम होतो.

### ( ६ ) एकीकडे

या भाषणप्रकारात एखाद्या विशिष्ट पात्राचे भाषण, रंगमंचावर इतर पात्रे असूनही, फक्त श्रोत्यांना ऐकू येत असते. भाषण करणाऱ्या पात्रास जणू काही तात्पुरता एकान्त लाभत असतो.

### ( ७ ) विशिष्ट पात्रोद्देशी

याही भाषणप्रकारात भाषणक्रियेचा आवाका तात्पुरता संकुचित केला असतो. उपस्थित पात्रांपैकी विशिष्ट पात्रांनाच बोलणाऱ्याचे भाषण ऐकू येत असते. कटासारख्या, हेरांची कारस्थाने इत्यादी घटना सादर करण्याकरिता प्रस्तुत भाषणप्रकार उपयोगी ठरतो. 'एकीकडे' या भाषणाप्रकाराप्रमाणेच 'विशिष्ट पात्रोद्देशी' भाषणाच्या नाटयात्म शक्यता मर्यादित वाटतात. मात्र त्याचा सार्वत्रिक आढळ पाहता उपयुक्तता वादातीत म्हटली पाहिजे.

### ( ८ ) श्रोत्यांना उद्देशून केलेली भाषणे

प्रेक्षकोद्देशी भाषणात संबंधित पात्राची श्रोत्यांशी प्रत्यक्षतः संपर्क साधण्याची इच्छा स्पष्ट होते. तीन बाजूंनी बंद पेटीत वावरायला लागल्यामुळे बंदिस्त व जखडलेला वाटणारा नाटयानुभव मुक्त करणे हा हेतू असतो. श्रोत्यांना नाटयप्रक्रियेत गुंतविणे, त्यांचा सहभाग अधिक सक्रिय ठेवणे या प्रयोजनांचाही आढळ होतो. नाटयानुभव भासमय नाही अशी तात्त्विक भूमिका घेतल्यास पात्रे व प्रेक्षक यांच्या दरम्यानचे कृत्रिम अंतर नष्ट करावे लागते. प्रस्तुत प्रकाराचा वापर आज वाढत्या प्रमाणावर आहे हे अर्थपूर्ण म्हटले पाहिजे.





अनुक्रमणिका

भाषण कोणास उद्देशून केले आहे हा पहिला निकष वापरून वर्गीकरण केले असतां नाट्यात्म भाषणप्रकाराचे आठ प्रकार कसे सिद्ध होतात ते पाहिले.

प्रस्तुत भाषणप्रकारांत भरताची भरही ध्यानात घ्यायला हवी. भरताने वर्णित केलेल्या भाषणप्रकारांपैकी आकाशभाषित, कर्णे, स्वप्नायित, आणि मृत्युशय्याप्रेरित हे नवीन वाटतात.

न दिसणाऱ्या पात्राशी उपस्थित पात्राचे भाषण आकाषभाषित होय. आजचे 'टेलिफोन' भाषण यात मोडेल. उपस्थित पात्राच्या कानात कुजबुजणे हा 'कर्णे' या संज्ञेचा अर्थ होय. उरलेल्या दोन भाषणाप्रकारांचा अर्थ स्पष्ट आहे. याशिवाय आसन-पाठ्य, स्थितपाठ्य हे प्रकार भरताने विवेचिले आहेत. परंतु विशिष्ट घटनाक्रम आणि हालचाल, संगीत इत्यादींशी अधिक निगडित असल्याकारणाने त्यांचा विचार इथे आवश्यक नाही. वृद्ध व बाल यांचीही भाषणे विचारात घेतली आहेत. मात्र प्रस्तुत भाषणे कुणाकडे जाणार यासंबंधी स्थिती अनिश्चित दिसते. आवाजाचे गुण, त्याचे वापर व दैनंदिन जीवनाचे बारीक निरीक्षण मात्र भरताच्या विवेचनातून मनावर ठसते.

## संदर्भ


१. Bhat G. K./Bharata Natya Manjari/Pune : Bhandarkar Oriental Research Institute/1975/P. 7.
२. Butcher S. H./Aristotle's Theory of Poetry and Fine Art/New York : Dover Publications/1951/PP. 23–31.
३. Craig, Edward Gordon/On the Art of Theatre/London : Heinemann/1957/P. 73.
४. Craig/PP. 99, 88, 180 etc.
५. काळे के. नारायण/ **नाट्यविमर्श**/ मुंबई : पॉप्युलर प्रकाशन/१९६१/ पृ. ५२, ५५.
६. लेले पु. रा./ **महाराष्ट्राचे दुसरे वेड**/ मुंबई : कर्नाटक प्रकाशन/१९६५/ पृ. १२५.
७. Edwards Christine/ The Stanislavsky Heritage : Its Contribution to the Russian and American theater / New York : New York Universiry Press, 1965, P. 239.
८. Toequeville, Alexis de / Some Observations on the Drama amongst Democratic Narions, in : The Theory of the modern State, ed Eric Bentley/Penguin Books/1968/ P. 480.
९. लेले पु. रा. / पृ. ८८.
१०. मराठे का. बा. / **नावल व नाटक याविषयी निबंध** / पुणे : १८७२ / पृ. ३४.
११. फाटक नानासाहेब/**हॅम्लेट रंगावृत्ती**/ मुंबई : जयलक्ष्मी प्रकाशन/ १९६२/ पृ. २९.



**७ ज्ञानदेवी, साहित्य सहवास, बांद्रा ( पूर्व ), मुंबई ४०००५१**

# डॉक्टर–पेशंट यांचे संज्ञापन

## प्रसन्न दाभोळकर

शाब्दिक आणि कायिक संज्ञापनाच्या आधारावर सर्व मानवी संबंधांचा डोलारा उभा राहिला आहे. हे संज्ञापन योग्य वेळी, नेमके, आणि सुस्पष्ट होण्यावर माणसाच्या शारीरिक आणि मानसिक स्वास्थ्यापासून, राष्ट्राराष्ट्रांतील संबंधांपर्यंत सर्व गोष्टी अवलंबून असतात. अनेक पातळ्यांवर ही संज्ञापने होत असतात. पति–पत्नींचे संज्ञापन, मित्रामित्रांतील संज्ञापन, वरिष्ठ–कनिष्ठ यांचे संज्ञापन, औपचारिक संज्ञापन या सर्व संज्ञापनाच्या गरजा, नियम, आणि कार्ये वेगवेगळी असतात. डॉक्टर-पेशंट संज्ञापन हे एक असेच विशिष्ट संज्ञापन आहे. याच्या आदर्श अशा प्रकाराचेही सर्व नियम स्पष्ट झालेले आढळत नाहीत. उदाहरणार्थ, पेशंटने काहीही न लपवता सर्व गोष्टी मोकळेपणाने सांगाव्यात अशी अपेक्षा असते. परंतु हाच मोकळेपणा डॉक्टरने पेशंटशी बोलताना दाखवावा का ? पेशंटला कॅन्सर झाला असून तो असाध्य अवस्थेत आहे हे डॉक्टरने सांगावे का ? दुसऱ्या डॉक्टरने सांगितलेली माहिती आणि उपचार मला चुकीचे वाटतात त्यावेळी डॉक्टर म्हणून मी काय करावे ? एखाद्या शस्त्रक्रियेसाठी पेशंटची परवानगी घेताना त्याला नेमकी किती माहिती द्यावी ? अनेकदा अशा प्रश्नांची आदर्श उत्तरेही नीट उमगत नसतात. प्रत्यक्षात घडणाऱ्या डॉक्टर-पेशंट संज्ञापनात तर याहून अनेक धागेदोरे गुंतलेले असतात. आज मराठी समाजात हे संज्ञापन कसे घडते आणि ते अधिक योग्य व्हायला काय केले पाहिजे याचा आढावा या ठिकाणी घ्यायचे ठरवले आहे. (माझे अनुभव मुख्यतः मनोविकाराच्या क्षेत्रातले असले तरी काढलेले निष्कर्ष वैद्यकाच्या इतर शाखांनाही कमी अधिक लागू पडावे.)

डॉक्टर आणि पेशंट यातील संज्ञापन हा कोणत्याही उपचार–प्रक्रियेचा पहिला टप्पा आहे आणि अखेरपर्यंत ते संज्ञापन नीट टिकून राहणे अत्यंत महत्त्वाचे असते. जर योग्य संज्ञापन असेल तरच डॉक्टरला रोग आणि रोग्याची परिस्थिती याचे अचूक निदान करता येते, रोग्याचा विश्वास संपादन करता येतो. त्याच्या आजाराचे स्वरूप, आवश्यक उपचार आणि पथ्ये याचे महत्त्व रोग्यास पटवता येते, आणि एवढे सगळे व्यवस्थित झाले तरच रोग बरा होऊ शकतो किंवा आटोक्यात राहतो.

दुर्दैवाने पेशंटशी कसे बोलावे, तो आपल्या भाषेत करीत असलेल्या तक्रारींचा नेमका अर्थ काय, त्याच्या मानसिक गरजा कशा ओळखाव्यात, त्याला आधार कसा द्यावा, त्याच्या आजाराचे आणि उपचाराचे स्वरूप त्याला समजेल अशाप्रकारे कसे सांगावे या

सर्व गोष्टींचे महत्त्व वैद्यकशास्त्र तत्त्वतः मान्य करते, परंतु त्याचे व्यवहारात प्रशिक्षण मात्र दिले जात नाही. प्रत्येक डॉक्टरला अनुभवाचे टक्के-टोणपे खात ते घ्यावे लागते आणि अर्थातच प्रत्येकजण त्यात यशस्वी होतो असे नाही. त्यामुळे प्रत्यक्ष घडलेल्या उदाहरणांच्या साहाय्याने आज घडत असलेल्या डॉक्टर-पेशंट-संज्ञापनाचे पैलू बघितले पाहिजेत.

अशा प्रकारे हे पैलू बघणे वाचकांपैकी डॉक्टरमंडळी आणि इतर संभाव्य पेशंट मंडळी या दोघांनाही उद्बोधक होऊ शकेल.

अयोग्य संज्ञापनामुळे गंभीर परिस्थिती उद्भवणे आणि केवळ योग्य संज्ञापनामुळे तिचे निराकरण होणे अशी उदाहरणे अर्थातच मानसिक आजारामध्ये जास्त आढळून येतात. माझे शिक्षक याबाबत दोन उदाहरणे नेहमी देत. एकदा एका कंपनीच्या अधिकाऱ्याच्या मोटारीला अपघात झाला. त्यात त्याचा ड्रायव्हर गेला, तो स्वतः डोक्याला मार लागून बेशुद्ध पडला, आणि त्याची बरीच हाडे मोडली. त्याला ताबडतोब दवाखान्यात दाखल केले, प्लॅस्टर केले, वेगवेगळे ताण लावले, आणि झोपवून ठेवले. त्याच्या मनाला धक्का पोचू नये म्हणून अपघातासंबंधी त्याला काहीही सांगितले नाही. परंतु तो अधिकारी बिथरल्यासारखे वागू लागला, बंधने तोडून पळायचा प्रयत्न करायला लागला, ओरडायला लागला, नीट झोपेना. झोपेची खूप इंजेक्शने देऊनही तो शांत होईना. शेवटी त्याला मेंटल हॉस्पिटलमध्ये हलवायच्या निर्णयावर सर्व आले. माझे शिक्षक मनोरुग्णालयाचे मुख्य असल्याने त्यांचा सल्ला घ्यायचा ठरले. त्यांच्या लक्षात आले की हा माणूस मानसिकदृष्ट्या ठीक आहे पण खूप गोंधळलेला आहे. मग त्यांनी त्याला झालेला अपघात, त्याला झालेली इजा, त्यावर इलाज करण्यासाठी त्याने ताण लावून घेऊन स्वस्थ पडणे कसे आवश्यक आहे हे हळुवारपणे समजावून सांगितले. मग तो अधिकारीही म्हणाला, "डॉक्टर, मला कोणी काही सांगायलाच तयार नव्हते. इलाजासाठी ज्या गोष्टी केल्या पाहिजेत त्या करायला माझी काहीच हरकत नाही. पण हे काय चालले आहे ते तरी मला कळायला नको का ?"

दुसरे उदाहरण असेच एका उच्चपदस्थ सरकारी अधिकाऱ्याचे आहे. वयाच्या पन्नाशीच्या सुमारास त्याला उदासीनता आली. कामात लक्ष लागेना, भूक उडाली, निद्रानाश झाला, जीवनात नैराश्य वाटू लागले. तो एका मनोविकारतज्ज्ञाला भेटला. त्याने त्याच्या अवस्थेचे बरोबर निदान केले आणि त्याला शॉक घ्यायला लागतील असे सांगितले. आपल्याला शॉक घ्यायला लागणार म्हणजे आपल्याला फार गंभीर मानसिक रोग झाला आहे आणि आता जगण्यात काही अर्थ नाही असे मानून त्या रात्री तो खिडकीतून उडी मारून जीव द्यायला निघाला. तेवढ्यात सुदैवाने त्याच्या बायकोने ते पाहिले आणि त्याला थांबवले. नंतर डॉक्टरांनी त्याला नेमका काय आजार झाला आहे, त्यावर शॉक-ट्रीटमेंट कशी उपयोगी असते, या उपचाराबाबत समाजात असलेले गैर-

समज व भीती कशी अयोग्य आहे हे समजावून सांगितल्यावर त्याचे दडपण कमी झाले आणि योग्य उपचार घेऊन तो पूर्ण बराही झाला.

सुरवातीची ही दोन्ही उदाहरणे मी मुद्दाम उच्चपदस्थांची घेतली. याचे कारण असे की सुशिक्षित पेशंटशी बोलताना, त्याला समजावताना डॉक्टरला अधिक अडचणी येत असतील असा आपला एक समज असतो. पेशंट सुशिक्षित आहे का नाही हा मुद्दा एवढा महत्त्वाचा नसतो तर त्याची समज किती आहे, आपल्या आजारासंबंधी त्याची काय कल्पना आहे, डॉक्टरशी तो मोकळेपणाने बोलू शकतो की नाही आणि डॉक्टर पेशंटला योग्य तितके विश्वासात घेतो की नाही ह्या गोष्टी जास्त महत्त्वाच्या असतात. अर्थात अशिक्षित पेशंटशी संवाद साधताना काही वेगळ्या अडचणी येतात. त्या मुख्यत: त्याची भाषा, तक्रारी सांगायची त्याची वेगळी पद्धत, आणि डॉक्टरच्या आणि त्याच्या पातळीत असलेला फरक यामुळे येतात.

अनेक अशिक्षित पेशंटना 'तुम्हाला काय त्रास होतो' असे विचारले तर ते 'तुम्हीच तपासून ठरवा डॉक्टर' असे उत्तर देतात. जणू आपण म्हणजे एक कोडे आहोत, आणि कोणत्याही मदतीशिवाय ते डॉक्टरने बरोबर सोडविले पाहिजे अशी त्यांची अपेक्षा असते. त्यांच्या तक्रारीही ते वेगळ्या पद्धतीने सांगतात, 'वात झाला आहे, पोटातलं झालंय, कामीण झालीय' ह्या तक्रारी आम्ही डॉक्टरांनी वैद्यकीय अभ्यासक्रमात कधी ऐकलेल्याच नसतात. बरे, सर्व पेशंट एकाच अर्थाने हे शब्द वापरतात असेही नाही. उदाहरणार्थ, 'वात' हा शब्द हातापायात मुंग्या येणे इथपासून अर्धांगापर्यंत अनेक गोष्टींना वापरला जातो. त्यामुळे अनेकदा वात म्हटला की काही पेशंट घाबरतात. याचा गैरफायदा घेऊन वातावरचे इंजेक्शन (!) देणारेही काही डॉक्टर आढळतात. ग्रामीण पेशंटला समजावून सांगतानाही वेगळे तंत्र वापरावे लागते. एखाद्या आजाराची आणि उपचाराची तांत्रिक माहिती अनेकांना समजत नाही, परंतु त्याच्या परिचयातील उदाहरणे दिली की त्याला मुद्दा लक्षात येतो. समजा एखाद्या आजारात बराच काळ नीट उपचार घेतले तर हळूहळू गुण दिसून येणार आहे. मग अशा वेळी चटकन फरक का दिसत नाही म्हणून मंडळी अस्वस्थ होतात. अशा वेळी लोणच्याचे उदाहरण देऊन, लोणचे मुरायला कसा वेळ लागतो तसे हे औषध अंगात मुरल्यावर फरक दिसू लागेल असे सांगितले की त्यांची समजूत पटते.

डॉक्टर-पेशंट-संज्ञापन अयोग्य रीतीने होण्याची इतरही कारणे असू शकतात. एखाद्या वेळी बारीकसा पण अत्यंत महत्त्वाचा मुद्दा पेशंटच्या लक्षात येत नाही. किंवा डॉक्टर गडबडीत सांगायला विसरतो. फिट्सच्या पेशंटबाबत हा दुर्दैवी अनुभव अनेकदा येतो. या आजारात फिट्स् पूर्णपणे थांबल्यावर ४ ते ५ वर्षे न चुकता औषध घेणे अत्यावश्यक असते. पेशंटच्या डोक्यात फक्त ४-५ वर्षे औषध घ्यायचे एवढेच असते. त्यामुळे मधून मधून फिट येतेय अशा अवस्थेत तो ४-५ वर्षे औषध घेतो आणि त्याचा

बहुमूल्य वेळ व पैसा वाया जातो. काही वेळा पेशंटला नीट सांगितलेले समजणार नाही या भावनेने काहीतरी सोपे व चुकीचे स्पष्टीकरण दिले जाते. अनेकदा मानसिक अस्वास्थ्यामुळे पेशंटला डोक्यात मुंग्या आल्यात, डोके जड वा हलके झालेय, चक्कर येते असे त्रास होतात. मानसिक त्रासाचे हे शारीरिक अंग आहे असे पेशंटला समजावून न सांगता तुझ्या मेंदूला रक्त कमी जात आहे असे चुकीचे स्पष्टीकरण दिले जाते आणि पेशंटची भीती आणखीन वाढते. काही वेळा डॉक्टर-पेशंट संज्ञापनामध्ये असलेल्या विश्वासाच्या अंगभूत भागाचा गैरफायदा घेऊन काही डॉक्टर पेशंटला जाणूनबुजून चुकीचा सल्ला देतात. एक मतिमंद मुलगा त्याची बौद्धिक क्षमताच नसल्याने बोलत नसता, त्याचे टॉन्सिल्सचे ऑपरेशन करा मग तो बोलेल असा सल्ला दिला गेला आणि प्रत्यक्षात ऑपरेशनही केले गेले.

एखाद्या वेळी एकाच शब्दाचा अर्थ डॉक्टर आणि पेशंट वेगवेगळया प्रकारे घेतात. माझ्या एका पेशंटला ' तुमची प्रकृती आता बरी आहे, तेव्हा पुढच्या वेळी औषधे कमी करू ' असे मी सांगितले. माझ्या मनात डोस कमी करू असा अर्थ होता तर त्या पेशंटने ' कमी करू ' म्हणजे ' बंद करू ' असा विचार केला आणि औषध थांबवले आणि त्याला परत त्रास व्हायला लागला. चक्कर येणे, शुद्ध जाणे हे शब्दही अनेक पेशंट एकाच अर्थाने वापरतात. उदाहरणार्थ, ' चक्कर येणे ' हा शब्द–प्रयोग गरगरणे, अंधारी येणे, तोल जाणे, पडणे, फिट् येणे अशा अनेक अर्थांनी वापरला जातो, यातला नेमका कोणता अर्थ अभिप्रेत आहे हे शोधून न काढताच औषधयोजना केली तर ती चुकायची शक्यताच जास्त.

योग्य संज्ञापन होऊन पेशंट जेव्हा बरा होतो तेव्हा मिळणारे समाधानही डॉक्टरला मोलाचे वाटते. अनेक लहान मुलांना त्यांचे पालक ' हा अशक्त आहे, काहीतरी टॉनिक द्या ' असे सांगत घेऊन येतात. अशा वेळी योग्य आहाराचे महत्त्व सांगून त्या मुलाला कोणता आहार पचेल व रुचेल हे समजावल्यावर त्या मुलाची प्रकृती सुधारते. तेव्हा खरे समाधान मिळते. अर्थात् टॉनिक लिहून देण्यापेक्षा याला जास्त वेळ आणि कष्ट लागतात.

पेशंटच्या आणि त्याच्या नातेवाइकांच्या रूढ कल्पना आणि अंधश्रद्धा याबाबत डॉक्टरला काही सांगायचे असेल तेव्हा फारच काळजीपूर्वक बोलावे लागते. त्याच्या कल्पना खुळचट आहेत असे म्हणून काहीच साध्य होणार नसते. माझ्याकडे जेव्हा मनोरुग्ण येतात तेव्हा हा देवाचा, देवतेचा किंवा भुताखेताचा प्रकार आहे अशी बहुतेक जणांची कल्पना असते. डॉक्टर म्हणून त्यावेळी माझे प्रथम कर्तव्य पेशंटवर नीट औषधोपचार केले जातील आणि बाहेरच्या उपायांच्या नावाखाली पेशंटच्या हालअपेष्टा होऊन पैसा वाया जाणार नाही हे बघणे असते. अशा वेळी मी त्यांना सांगतो, ' तुमचा आजार देवामुळे आहे असे खुशाल माना. पण हे जगच त्याच्यामुळे आहे.

डॉक्टर, इंजेक्शन, औषधे हेही देवानेच केले आहे. त्यामुळे डॉक्टरचा इलाज केल्यामुळे देव रागावणार नाही. बरं, हे सगळे जग त्याचेच आहे. त्यामुळे त्याला तुम्ही लुगडे, चोळी, कोंबडी द्यायची गरज नाही. फक्त तुमच्या देवाला तुम्ही मनापासून नमस्कार करा, व्यवस्थित औषधोपचार करा म्हणजे तुमचा पेशंट बरा होईल.' अर्थात् वेगवेगळ्या आजारांबाबत समाजात असलेल्या अंधश्रद्धा अशा तात्कालिक उपायांनी एकस्यादुकट्या डॉक्टरकडून पूर्ण दूर होऊ शकत नाहीत तर त्याला सामाजिक पातळीवरून प्रयत्न करणेही आवश्यक असते.

डॉक्टर– पेशंट– संज्ञापन केवळ शाब्दिक असते असे नव्हे तर त्याला कायिक अंगही असते. पेशंटला काळजीपूर्वक स्पर्श केला तर निश्चितच दोघात अधिक निकटचा अनुबंध तयार होतो. माझ्या मित्राचे वडील एका प्रसिद्ध डॉक्टरांकडे रक्तदाब तपासायला गेले होते. नंतर ते सांगत होते, 'त्यांनी रक्तदाब बघितला आणि नंतर माझ्या पाठीवरून हात फिरवला. मला माझ्या आईची आठवण झाली. तिच्याशिवाय इतर कोणी माझ्या पाठीवरून एवढ्या मायेने हात फिरवला नाही!' याउलट डॉक्टरच्या स्पर्शामुळे त्याची शिसारी आलेलेही काही रुग्ण आढळतात. स्पर्श कसा ते महत्त्वाचे आहे.

पेशंट बरा करणे हे डॉक्टरचे प्रधान कार्य आहे. यासाठी केवळ योग्य उपचार पुरे पडत नाहीत तर योग्य डॉक्टर–पेशंट-संज्ञापन आवश्यक असते. डॉक्टरवर विश्वास बसणे, त्याने सांगितलेली औषधे आणि पथ्ये नीट कळणे, आपल्याला काय काळजी घेतली पाहिजे हे पेशंटला समजणे ह्या गोष्टी प्रत्यक्षात यायला हव्या असतील तर पेशंटशी बोलण्याची एक वेगळीच हातोटी डॉक्टरला शिकावी लागते. डॉक्टरचा प्रामाणिकपणा, ज्ञान, तळमळ इत्यादी गुण यासाठी पुरे पडतीलच असे नाही. अनेकदा थोडासा नाटकीपणा करावा लागतो, रागवावे लागते. साधे बद्धकोष्ठ असलेल्या माणसाला 'काही विशेष नाही. रात्री थोडे मिल्क ऑफ मॅग्नेशिया घ्या म्हणजे झाले' असे जाताजाता सांगितले तर तो तसे न करण्याचीच शक्यता जास्त. परंतु त्याऐवजी 'शरदराव, तुमचा कोठा जरा जड आहे. घाबरायचे कारण नाही पण नीट काळजी घेतली पाहिजे. तेव्हा दररोज रात्री उकळून गार केलेले पाणी एक ग्लास भरून घ्या. त्यात एक चमचा मिल्क ऑफ मॅग्नेशिया टाका. नीट ढवळा आणि झोपण्याआधी पंधरा मिनिटे घ्या.' असे फुलवून सांगितले तर तो सल्ला नक्की ऐकला जाणार.

डॉक्टर–पेशंट-संज्ञापनाचे असे अनेक पैलू आहेत. परंतु आज वैद्यकमहाविद्यालयात पेशंटशी कसे बोलावे, कसे वागावे, त्याचा विश्वास कसा संपादन करावा, आपले म्हणणे त्याला कसे समजावून सांगावे, याचे शिक्षण दिले जात नाही. हृदयाच्या झडपेचा आजार व्हायची कारणे कोणती आहेत हा प्रश्न विद्यार्थ्याला परीक्षेत अनेकदा विचारला जातो. पण तुला हृदयाच्या झडपेचा आजार आहे हे तू या रोग्याला कसे समजावून

सांगशील असे एकदाही विचारले जात नाही. प्रत्यक्षात व्यवसायात पडल्यावर मात्र डॉक्टरच्या लक्षात येते की पेशंटशी आपण कसा संवाद साधतो याला अत्यंत महत्त्व आहे. मग अनुभवातूनच प्रत्येकजण शिकत जातो. डॉक्टर–पेशंट-संज्ञापन अचूक कसे होईल याचा जाणीवपूर्वक विचार करणारे थोडेच असतात. बहुसंख्य डॉक्टर कधी योग्य तर कधी अयोग्य पद्धतीने पेशंटशी बोलतात. त्यामुळे अनेकदा हेतू चांगला असूनही घोटाळे होतात. यासाठी डॉक्टर-पेशंट-संज्ञापन योग्य प्रकारे करण्याचे व्यावहारिक ज्ञान आणि अनुभव प्रत्येक वैद्यकीय विद्यार्थ्याला देणे आवश्यक आहे.

**सुमन क्लिनिक, महाजनी वाडा, मोती चौक, सातारा ४१५००२**

[ भाषाव्यवहाराच्या या जिव्हाळ्याच्या अंगाकडे पुरेसे लक्ष गेलेले नाही. पश्चिमेकडे गेल्या काही वर्षांत मात्र काही लेख आणि लेखसंग्रह प्रसिद्ध झालेले दिसतात. उदा. Sue Fisher, Alexandra Dundas Todd, ed. The Social organization of doctor patient communication, Washington, D. C. : Center for Applied Linguistics. भारतात तर आनंदच आहे. (नाही म्हणायला मराठीत एक लेख आहे– सुभाष पत्की, डॉक्टर आणि अशिक्षित रुग्ण यांचा संवाद, **नवभारत** ऑगस्ट, सप्टेंबर १९८१ ) डॉक्टर दाभोळकरांच्या या लेखाचा पाठपुरावा **भाषा आणि जीवन**च्या वाचकांपैकी डॉक्टर, वैद्य, आणि इतर मंडळी यांनी आपापल्या परीने करावा. आणि पुढील प्रश्नांवर प्रकाश टाकावा. डॉक्टर / वैद्य यांनी काय, कसे बोलावे अशी रुग्णाची, भोवतालच्या लोकांची अपेक्षा असते ? रुग्णाने काय, कसे बोलावे अशी डॉक्टर / वैद्य यांची अपेक्षाअसते ? डॉक्टर/वैद्य यांच्या प्रशिक्षणात रुग्णाशी संज्ञापन हा विषय दुर्लक्षित राहतो ही उणीव कशी भरून काढता येईल ? इंडियन मेडिकल कौन्सिल सारख्या संस्थांना जाग कशी आणता येईल ? डॉ. दाभोळकरांच्या लेखात न आलेली अशी काही या विषयाची अंगे आहेत का ? लोकांच्या तोंडी असणाऱ्या शब्दप्रयोगांची यादी, त्यांचा वैद्यकीय परिभाषेत अनुवाद यांचेही स्वागत होईल. — संपादक ]

**उगीच भानगड नको !**

चरित्र छापताना कल्पित भाग लाल शाईत छापावे आणि वास्तव भाग काळ्या शाईत छापावे अशी आमची सूचना आहे.

**पब्लिशर्स वीकली** ( लंडन ) सुमारे १९८३








# उसनवारीची उसनवारी

## आशा मुंडले

पुण्यातील एका घराचे नाव आहे सुवर्णमोहर. हे आहे gold mohur या इंग्रजी झाडाच्या नावाचे भाषांतर. त्या झाडाला आपण म्हणतो गुलमोहोर. परंतु घर-मालकीणबाई बागकाम इंग्रजीतून शिकलेल्या. मुले इंग्रजी माध्यमात शिकायला लागली म्हणजे अशा गमती यापुढे वाढतीलच. सगळ्यात कळस म्हणजे इंग्रजी नाव अर्धे भाषांतर अर्धी शब्दाची सरळ उचल अशा स्वरूपाचे आहे. बाईंच्या मनातली झाडे त्यांच्या बागेत दिसतात मात्र छानच.

**मयूरेश, १५।१ ए पौड रस्ता वसाहत, पुणे ४११०३८**

(गंमत इथे संपलेली नाही. हे झाड मुळातले मादागास्कर बेटातले. त्याला भारतीय संदर्भात इंग्रजीत gold mohur किंवा gulmohar म्हणतात, पण इतर royal Poinciana म्हणतात. फार्सीमध्ये गुल-मुहर किंवा गुले-मुहर असा शब्द नाही. हिंदी, उर्दू कोशात चटकन मिळाला नाही. समजा तो गुल्-मुहर अशा स्वरूपात मिळाला, तरी व्युत्पत्तीचा प्रश्न राहतो. **लिट्ल् ऑक्स्फर्ड डिक्शनरी**, सप्लिमेंट ऑव्ह इंडियन वर्डज् मध्ये व्युत्पत्तीच्या खाती फक्त प्रश्नचिन्ह टाकले आहे. एक तर्क : गुल-मुहर / गुलमोहोर हा भारतीय माळ्यांनी gold mohur ला दिलेला बनावट फार्सी वेष (सार्सापरिलाचे सासरापळाला होते त्यातलाच प्रकार). आता इंग्रजी gold mohur कुठून आले ? (gulmohar ही अगदी अलीकडची भर, जुन्या आवृत्त्यांतून न सापडणारी.) अशा नवीन झाडांना आवडीने नवीन नावे ठेवण्याचा साहेबाचा छंद इतर नावांत दिसतो. (उदाहरणार्थ, पळसाला flame of the forest, parrot tree म्हणतात (फार्सी नाव गुले-पलास संस्कृत पलाश वरून घेतलेले आहे (गुल् म्हणजे फूल))). गुलमोहोराच्या फुलांना मोहून gold mohur हे नवीन नाव आवडीने दिलेले असणे अशक्य नाही. ते गुल्-मुहर् वरून घेतले असावे असे आशा मुंडले यांना वाटते ते बरोबर नसावे.

वनस्पतिविज्ञानात या झाडाचे नाव Delonix regia, Rafi. = Poinciana regia, Bojer. असे आहे. ( = या खुणेनंतरचे नाव अगोदरचे रद्द केलेले नाव असते. regius या लॅटिन विशेषणाचा अर्थ शाही, royal. त्या झाडाच्या सौंदर्यामुळे वैज्ञानिकसुद्धा दिपले असे दिसते).

तर अशी आहे उसनवारीची उलझन. [ उलझन हा हिंदी शब्द उसना घेण्याजोगा आहे असे मला नेहमीच वाटत आलेले आहे. ] –संपादक)

# लहान मुलांची भाषा : काही नोंदी

## जाई निंबकर

लहान मुलांच्या भाषेच्या वापराच्या निरीक्षणावरून बांधलेले काही आडाखे वाचकांच्या विचारार्थ मांडीत आहे.

मूल सामान्याकडून विशेषाकडे आणि ह्या उलट परिक्रमण सहजतेने करू शकते. एका छोटचा मुलीनं सांगितलं, " वीज गेली की आई पक्षी लावते. " अर्थात तिला म्हणायचं होतं चिमणी.

ह्या मुलीनं विचारलं, "हे झाड कसलं आहे ?" मी– " भेंडीचं. " दुसऱ्या दिवशी ती म्हणाली, " मला वांग्याच्या झाडाची फुलं देतेस का ?" इथे काय झालं हे उघड आहे. ह्या झाडाची पानं–फुलं भेंडीच्या रोपासारखी दिसतात म्हणून त्याला भेंडीचं झाड म्हणतात हे तिला माहीत नाही. 'भेंडी' ह्याचं वर्गीकरण तिच्या मेंदूत 'भाजी' असं आहे. परत स्मरण करताना 'भेंडी' हा शब्द तिला आठवत नाही, पण 'कुठली तरी भाजी' एवढी माहिती तिला मिळते.

ह्याच प्रक्रियेचा आणखी एक आविष्कार म्हणजे सारख्या दिसणाऱ्या किंवा तसेच कार्य करणाऱ्या दोन वस्तूंना एकच नाव देणे किंवा त्यांच्या नावात गोंधळ करणे. दोन वर्षांची एक मुलगी डब्याचं दार उघड असं सांगते. मला वाटतं वयपरत्वे वस्तूंचे वरवरचे गुणधर्म दुर्लक्षून थेट त्यांच्या गाभ्याशी जाण्याची आपली क्षमता कमी होते. दार व झाकण ह्या वस्तूंचे प्रयोजन एकच असतं हे मुद्दाम विचार केल्याखेरीज आपल्या ध्यानात येत नाही. हीच मुलगी उशीला गादी म्हणते. खोळात कापूस भरून केलेल्या दोन वस्तूंचे आकार वेगळे म्हणून त्यांना वेगळी नावं देणं तिला संमत नाही.

ह्या क्षमतेमुळे कधी कधी चकित करून सोडणाऱ्या उपमा लहान मुलांच्या तोंडून ऐकायला मिळतात. दिवेलागणीच्या नंतर कात्रज घाटातून पुण्याकडे पाहून माझी मुलगी म्हणाली होती, " आई, ते बघ कित्ती बैलांचे डोळे चमकताहेत. " एक छोटा मुलगा अशा ठिकाणी जाऊन आला की तिथे वीज पुरवठा जनरेटरने होत असे. रात्री १० वाजता वीज जायची आणि ती जाण्याआधी इशारा म्हणून तीनदा जा ये करायची. त्या मुलाने ह्या प्रकाराचं वर्णन केलं–" तिथे अंधाराचे ठिपके पडतात.

पारंपरिकतेच्या ताठरपणापासून मुक्त असल्यामुळे लहान मुलांचे विचार व ते व्यक्त करण्यासाठी त्यांनी वापरलेली भाषा ही चाकोरीबद्ध नसून लवचिक असतात. भिंतीवर चढत असलेला साप बंदुकीने मारताना एक छरा भिंतीवर आपटून उसळला आणि भोवती उभ्या असलेल्यांपैकी एकाच्या पायाला लागला. मी आयोडिन

आणते आहे असं पाहून माझ्या छोट्या मुलीनं विचारलं, "आई, सापाला फार लागलं का ?" सापाला जाणून बुजून ठार मारणारे लोक त्याला लागलं म्हणून मलमपट्टी करण्याची सुतराम् शक्यता नाही. असले फालतू विचार लहान मुलाला शिवत नाहीत. त्याचप्रमाणे समाजाची बरीवाईट मूल्ये, सांस्कृतिक चौकट ही त्याने स्वीकारलेली नसतात. माझ्याकडे पेरू तोडायला एक जोडपं येतं. त्यातली बाई जास्त बोलकी, दिसायला ठसठशीत, आठवणीने माझ्या नातीच्या हातावर छानसा पेरू ठेवणारी—एकूणच त्या पोरीच्या दृष्टीने जास्त महत्त्वाची व्यक्ती. तेव्हा ती त्या दोघांना माळीणबाई आणि माळीबुवा असं म्हणते. कुटुंबातली किंवा समाजातली व्यक्तीची भूमिका बदलल्यास तिला संज्ञा देण्याची पद्धत बदलावी हे तिने ओघानेच स्वीकारलं आहे.

टपालपेटी२३, फलटण ४१५५२३

# ‘ जोडअसर ’

## विश्वनाथ खैरे

**भाषा आणि जीवन**, ४:३, पावसाळा १९८६ मध्ये जनावरांच्या दलालांची सांकेतिक भाषा पारुशी तपशिलाने दिली आहे. तिचा उलगडा विविध भाषांच्या मदतीने करता येतो.

पारुशी बोलीतील पुष्कळशा संख्यांच्या नावाचे मूळ अरबी भाषेतल्या शब्दांशी संबंधित दिसते.

अरब : = चार, सब : = सहा, अशर : = दहा, खम्स : = पाच या अरबी शब्दांवरून अरब, सबई, असर, खम्मस हे सांकेतिक शब्द आल्याचे सरळ दिसते. थलाथ : = तीन यावरून धला आला असावा. त्यात बोलण्या–ऐकण्यातून जो ध्वनींचा बदल होतो त्याचा परिणाम दिसतो.

पुन्हा, अरबी संख्याशब्द सगळे तसेच्या तसेच घेतले तर ओळखू येतील म्हणून त्यातही संकेतांचा वापर आहेच. उदा. कफ'अ = तळहात. त्यावरून कप = पाच. हाच संकेत पंजा = पाच या मराठी शब्दातही आहे. गीरी पंजा = तीन पंजे म्हणजे पंधरा. संस्कृतातला संकेतही रीखी = सात यात आला आहे. रीखी म्हणजे ऋषी सप्तर्षींच्या तारापुंजावरून संस्कृतातही सात या संख्येसाठी ऋषि, मुनि हे शब्द वापरतात. माणसाचे डोळे दोन म्हणून ‘ नेत्र’ने दोन ही संख्या दाखवतात. तसेच हातही दोनच असतात. हाताला अरबीत यदा म्हणतात. म्हणून पारुशी भाषेत याज = दोन असा संकेत आला.

अकराला एकी असर म्हणताना एक जसाच्या तसाच वापरला. (एकी असर = एक अधिक दहा.) पण एक साठी मात्र कईल = माप, प्रमाण माप (मुख्यत: मापटे-चिपटे यासारख्या आकारमानाचे माप) हा अरबी शब्द घेतला. त्याचा मऱ्हाटी कईल्या करून टाकला. एक हे संख्यांचे प्रमाण माप आहेच.

संकेत भाषा दुर्बोध करायची तर अनेक वेगवेगळ्या भाषांमधले शब्द घ्यायला हवेत. म्हणून अकरा ते चौदामधल्या दहासाठी अरबी असर योजिला तरी सुद्धा दहासाठी मात्र हत्तु हा कन्नडमधला प्रचलित शब्द घेतला. नऊसाठी उन्नी शब्द घेतला. त्यात उणे हा मराठी शब्दसंकेत आहेच (एक–उणा–वीस = एकोणवीस असतो तसा.) पण त्या साऱ्याच्या मुळाशी दक्षिणी भाषांमधला उण् = खाणे (उण करणे) हा बीज शब्द आहे. त्याचप्रमाणे ठोकन = हजार याच्या मुळाशी तोक्क =

समुदाय, असा दक्षिणी बीजशब्द असावा. पन्नासला अर्धा ऐवज म्हटले त्यात शंभरला ऐवज हा डबोलेसारखा शब्द योजिला. पण शंभरला शिकारा म्हणताना शेकडाचीच आठवण होते. कमी करणे, कुऱ्हे करणे (कुऱ्हाड चालवणे) म्हणजे खुरटे करणे, उणे करणे या अर्थाने खुराड, खु हे शब्द आले.

पारुशी बोलीत गीरी आणि गाफा यांचे अर्थ तीन आणि चार (विसा) असे दिसतात. त्यांचा उपयोग करून इतर संख्याशब्द बनवताना मात्र गणिती तर्काशी मुद्दाम थोडी धरसोड केली आहे :

गीरी असर = ३ अधिक १०=१३
गीरी पंजा = ३ गुणिले ५=१५
पण, गीरी = ६०=३ गुणिले २०
त्याचप्रमाणे गाफा असर = ४ अधिक १०
पण, गाफा = ८०=४ गुणिले २०

म्हणजे गाफा किंवा गीरी यांच्यापुरतेच दशकासारखे विसा किंवा खंडी हे एकक धरले आहे म्हणून मग–

साडे गीरी = साडेतीन विसा = ७०
साडे गाफा = साडेचार विसा = ९०
सवा गाफा = सव्वाचार विसा = ८५
पावने गाफा = पावणेचार विसा = ७५.

दोनशेला याज शिकाऱ्या म्हणून वर डुबरा असा दुसरा शब्दही योजला आहे. त्याच्यामागे थोडा लांबट संकेत दिसतो. डुबर शब्द पोक या अर्थाने गावरान बोलण्यात येतो. त्याचे अरबी मूळ दुब्र म्हणजे पाठ. पाठ म्हणजे 'दुसरी' बाजू या अर्थाने तिचा 'दोन शे' या आकड्याशी संबंध जोडला.

संख्या सोडून इतर जे शब्द किंवा पदे या भाषेतून वेचून दिली आहेत, त्यांमध्येही अनेक प्रमाणभाषांचे मिश्रण दिसते. अर्घे अर्घे (बरोबर) या अर्थी राईट हा इंग्रजी शब्दसुद्धा तिच्यात आहे. थंग म्हणजे थांब तर ठंगेरी म्हणजे थांबणारी मुले. या शब्दांमध्ये जसा वर्णबदल दिसतो तसाच इतरही शब्दांमध्ये करून संकेतशब्द ओळखू येऊ नये याची कसोशी केली जाते. बोल भाषेत आणखीही बदल होत असतातच.

मुख्यत: संख्या गुप्त ठेवण्यासाठी ही बोली बनवली गेली. पुष्कळ संख्याशब्द अरबी आहेत. ते मुसलमानी अंमलातील फारसीवरून आले असणार. ही फारसी सामान्य मराठी शेतकऱ्याला अनोळखीच होती. पूर्वी कन्नड किंवा कानडी भाषा मऱ्हाटी माणसाला अशीच अनोळखी असायची. त्यामुळे 'कानडे' म्हणजे अनोळखी असे ज्ञानेश्वरीतही म्हटले गेले. त्याचप्रमाणे फारसी किंवा पारुशी म्हणजे अनोळखी

असा जो अर्थ झाला असेल त्यावरून या दलाली बोलीचे 'पारुशी' हे नाव पडले असावे. पारोशेपणाचा असंबद्ध आभास निर्माण करून बोलीचे नावही गूढ केले.

त्या बोलीचे गुपित उघडे करणाऱ्या लेखकाला दलाल 'जोड–असरचा' म्हणतील, तर शेतकरी ह्या बोलीला जोड–असरची म्हणत असतील. तसे पाहिले तर अनेक प्रकारचे (जोड) प्रभाव (असर) तिच्यावर पडलेले असतात म्हणून प्रत्येकच बोली आणि भाषाही या अर्थाने जोड असरची म्हणता येईल. मग ती पारुशी मराठी असो की सोवळ्यातली संस्कृत असो.

**३७४ साधु वासवाणी नगर, औंध, पुणे ४११००७**

## न झालेला संवाद

संदर्भ : **भाषा आणि जीवन** ४ : ४ दिवाळी १९८६ पृ. ३९ वर 'कानी पडलेला संवाद' म्हणून **पत्रसारांश** या पत्र–नियतकालिकावरून एक पानपूरक दिले आहे. **पत्रसारांशचे** श्रीकृष्ण बेडेकर आणि विश्राम बेडेकर यांचा हा संवाद. त्यावर विश्राम बेडेकरांकडून आलेले पत्र.

'पहिली गोष्ट : सदर संवाद काल्पनिक–अगदी निराधार आहे. सदर गृहस्थाचा माझा परिचय नाही, समक्ष टेलिफोनवर वगैरे कधीही भाषण झालेले नाही. हा इन्कार छापायला हवा असे नाही. पण अशा बाबतीत काय काळजी घ्यायला हवी हे ध्यानात आले तरी पुरे. दुसरी गोष्ट. कुणीही मुंबईकर आपल्या पाहुण्याला सध्याच्या वाहतूक गर्दी कोंडीच्या दिवसात 'निश्चित सांगा– ४ की ५' असे म्हणण्याइतका कोरडा असण्याची शक्यता नाही.'

बोध घेतला, दिलगीर आहोत.– संपादक

# एक मराठी-मराठी शब्दकोश आणि त्याच्या निमित्ताने

**अभिनव मराठी-मराठी शब्दकोश** संपादक द. ह. अग्निहोत्री; व्हीनस प्रकाशन, पुणे ३०; – भा. १, अ–औ, ऑक्टोबर १९८३, पृ. ५५+३६७. – भा. २, क–ठ, ऑक्टोबर १९८५, पृ. ५६४. – भा. ३, ड–फं, मे १९८४, पृ. ५६८. – भाग ४, ब–व, डिसेंबर १९८३, पृ. ५४२. – भा. ५, श–ज्ञ, ऑक्टोबर १९८५, पृ. ६५०. (पाची खंडांची एकूण किंमत २००० रु.)

परीक्षणलेखक : **सु. रा. चुनेकर**

जशी संस्कृती, तशी भाषा; आणि जशी भाषा, तसे त्या भाषेचे शब्दकोश. शब्दकोशात समाजाच्या संस्कृतीचे दर्शन घडते, आणि शब्दकोशात शब्दांचा संग्रह असल्याने शब्दकोश संस्कृतीचा आरसा असतो. मराठीमध्ये शब्दकोशांची परंपरा दीर्घ आहे. महाराष्ट्रावर ब्रिटिशांची राजवट सुरू होण्यापूर्वीही मराठीत शब्दकोशसदृश रचना होत होती. पण ब्रिटिश राजवटीनंतर महाराष्ट्राच्या संस्कृतीला सर्वांगीणच नवे वळण लागले, आणि त्यानंतर शब्दकोशही आधुनिक पद्धतीचे, आधुनिक दृष्टीचे होऊ लागले. ब्रिटिश अमदानीतील पहिला महत्त्वाचा ' कोश ' या प्रौढ नामाभिधानाला शोभेसा एकभाषिक मराठी शब्दकोश म्हणजे शास्त्रीमंडळींनी तयार केलेला " महाराष्ट्र भाषेचा कोश " (इ. स. १८२९). यानंतर मराठी भाषेचे निरनिराळ्या स्वरूपाचे अनेक लहानमोठे कोश झाले. त्यांतील सर्वांत महत्त्वाचा, समावेशक, बृहद् एकभाषी कोश म्हणजे दाते-कर्वे-चांदोरकर-दातार यांचा " महाराष्ट्र शब्दकोश "– १९३२ पासून १९३८ पर्यंत याचे खंड प्रकाशित झाले, आणि १९५० मध्ये त्याचा आठवा, पुरवणी खंड प्रकाशित झाला. हा कोश गेली कित्येक वर्षे दुर्मिळ झाला आहे. आणि अशा कोशाची आवश्यकता वारंवार वाटत होती. ती उणीव, त्या कोशानंतर अर्धशतकाने प्रसिद्ध झालेल्या डॉ. द. ह. अग्निहोत्री यांच्या " अभिनव मराठी-मराठी शब्दकोशा " ने बऱ्याच प्रमाणात दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. आज तरी आता एवढा बृहद्, समावेशक दुसरा एकभाषी मराठी कोश नाही.

डॉ. अग्निहोत्री यांनी हा कोश केवळ एकट्याच्या परिश्रमाने सिद्ध केला आहे. असे

मोठे काम एकच व्यक्ती जेव्हा सिद्ध करते, तेव्हा त्या कामाला जसे काही विशेष प्राप्त होतात, तशाच काही (ब-याच अंशी) स्वाभाविक मर्यादाही पडतात. डॉ. अग्निहोत्रींच्या या कोशासंबंधीही हे खरे आहे. वस्तुतः या अशा कामाचा पसारा, आवाका एवढा असतो, आणि दिवसेनदिवस तो वाढतच असतो की, आता अशी कामे सांघिकच व्हावयास हवीत. पण महाराष्ट्रात दिसते ते असे की, इथे अशी मोठी कामे एकेका व्यक्तीनेच आपल्या ध्येयबुद्धीने, निष्ठेने, आंतरिक ऊर्मीने तडीला लावली आहेत. उलट सर्वांगांनी अनुकूलता असलेली कामे मात्र वर्षानुवर्षे रेंगाळत चाललेली आहेत. महाराष्ट्रराज्य-साहित्य-संस्कृति-मंडळाचा विश्वकोश, आणि शब्दकोश ही याची ठळक उदाहरणे आहेत! या पार्श्वभूमीवर तर डॉ. अग्निहोत्रींच्या कार्याचे मोल विशेषच वाटू लागते. विशेषतः एखाद्या ध्येयाने प्रेरित होऊन, त्या कामाला वाहून घेऊन अशी कामे निरपेक्ष, 'जनसेवे'च्या भावनेने करण्याची प्रवृत्ती दुर्मिळ होत चाललेली दिसत असताना डॉ. अग्निहोत्रींनी उतारवयात हा शब्दयज्ञ मांडला, त्याची यशस्वी सांगता केली ही घटना निश्चितच आश्वासक, प्रेरक ठरणारी आहे. निवृत्तीनंतर, वयाच्या चौसष्टाव्या वर्षी, १९६६ च्या जुलैमध्ये डॉ. अग्निहोत्रींनी हे काम स्वयंप्रेरणेने अंगीकृत केले, आणि वयाच्या ग्याहत्तराव्या वर्षी, १९७५ मध्ये यशस्वीपणे समाप्त केले. प्रकाशनाच्या, मुद्रणाच्या नानाविध अडचणींतून मार्ग काढीत १९८३ मध्ये या कोशाचा पहिला भाग प्रसिद्ध झाला, आणि दोन वर्षांनी, १९८५ मध्ये त्याचा पाचवा भाग प्रसिद्ध होऊन या कार्याची सुफल संपूर्ण सांगता झाली.

प्रस्तुत लेख हे या कोशाचे समग्र समीक्षण नव्हे. महाराष्ट्रात अनेक कोश होतात, पण कोशांचे अभ्यासपूर्वक परीक्षण होत नाही! तसे ते व्हायला हवे पण या लेखाचा उद्देश तो नाही. या कोशाच्या निमित्ताने काही विचार मांडावेत, आणि या कोशाचे अंशदर्शन घडवावे एवढीच या लेखाची भूमिका आहे.

डॉ. अग्निहोत्री यांच्या या शब्दकोशाचा परामर्श घेण्यापूर्वी, त्याच्या निमित्ताने शब्दकोशविषयक काही सर्वसामान्य विचार मांडावेत असे वाटते, काही प्रश्न निर्माण करावेसे वाटतात. मुळात तत्त्वतः शब्दकोश तयार करणे शक्य आहे का? शब्दकोशाचे उद्दिष्ट काय असावे? शब्दकोश कुणासाठी? त्याच्या रचनेचे धोरण काय असावे? अशा काही प्रश्नांची चर्चा करावी असे वाटते. (चर्चेत व्यर्थ कालापव्यय करण्यापेक्षा, आज मराठीत जेवढे, जसे शब्दकोश होतील, तेवढे, तसे होण्याची आवश्यकता आहे. ज्यांना काही काम करावयाचे नाही, किंवा करता येत नाही, ते चर्चा करतात; आणि ज्यांना काम करावयाचे आहे ते चर्चेत व्यर्थ वेळ व शक्ती दवडीत नाहीत याचे भान मला आहे.)

तत्त्वतः 'शब्दकोश' ही रचना अशक्य आहे असे म्हणता येईल. शब्द ही चैतन्यशील घटना आहे. म्हणूनच काळाच्या प्रवाहात काही शब्दांचे अर्थ बदलत जातात, काही शब्द मरतात, काही जन्म घेतात. अशा चैतन्याने स्फुरण पावणाऱ्या शब्दांचा

कोश ही अशक्य घटना आहे. विशेषतः कवितेच्या शब्दांच्या संबंधात हा विचार अधिक निर्माण होणारा आहे. केशवसुत, गोविंदाग्रज, बालकवी, मर्ढेकर... अशा स्वयंप्रातिभ कवींच्या कवितेत असे चैतन्याने सतत स्पंदन पावणारे अनेक शब्द असतात. त्यांना त्या कवितेच्या संदर्भात, तेवढ्याचपुरता विशिष्ट भावार्थ असतो. तो कोशात कसा बंदिस्त करणार ? कोशात शब्द आला की, तो जड झाला. अशा सचेतन शब्दांचा कोशात समावेश करून त्यांचे अर्थ मर्यादित केले की, त्या कवितांच्याही भावार्थवलयांची प्रसरणशीलता संकोच पावते. केशवसुतांच्या कवितेतील ' झपूर्झा ', ' श्रेय 'सारख्या शब्दातील अर्थवेध घेण्यासाठी किती चर्चा झाली आहे ! ' झपु ( पू ) र्झा- (काव्य) जा पोरी जा; अत्यानंदाची स्थिती ' किंवा ' श्रेय- [१]शुभ; लाभ; कल्याण; ऐश्वर्य; चांगुलपणा. [२]पुण्य; फल; कर्तृत्व. ' अशा कोशगत अर्थांतून त्या कवितांतील शब्दयोजनेचा गाभा कसा गवसू शकणार ? काव्यात, साहित्यात शब्द असे ताजे, जिवंत होतात. कोशात असे जिवंत शब्द धरता येत नाहीत. शब्द कोशबद्ध करणे म्हणजे उडते नाचरे रंगीबेरंगी फुलपाखरू टांचणीने टाचून ठेवणे ! कोशगत अर्थाबाहेर शब्दांची भावार्थकक्षा पुष्कळ राहाते. ' नवशब्दांचे घुंगर बांधुनि रसवंती माझी। नाचत डोलत करि शिणलेली मने पुन्हा ताजी. ' (' हृदयशारदेस ') या ओळीत ' रसवंती ' असा खास अर्थसघन शब्द गोविंदाग्रज ' कविता ', ' प्रतिभा ' यासाठी वापरून जातात. त्यामध्ये स्त्रीची प्रतिमाही आहे. ( माटे यांची " रसवंतीची जन्मकथा " आहेच. ) ही ' रसवंती ' शब्दकोशात कशी अटकणार ? (' अभिनव 'मध्ये हा शब्द नाही. ' महाराष्ट्र शब्दकोशा 'त आहे.) थोड्या ढोबळपणाने म्हणायचे तर कोशात शब्दांचे वाच्यार्थच तेवढे देणे शक्य आहे. त्यापलीकडे लक्ष्यार्थ, व्यंग्यार्थ यांचे जे विशाल क्षेत्र आहे, ते शब्दकोशाच्या कवेत येऊ शकत नाही. कोशात शब्दांच्या अर्थांचे साधारणीकरण तेवढे नोंदवणे शक्य आहे. शब्दाच्या नाजूक अलवार कडा गुळगुळीत करूनच कोशात ते घेतले जातात. ही शब्दकोशाची आंगिक मर्यादा; आणि तेच त्यांचे स्वरूप.

मर्ढेकरांनी ' वाङ्मय आणि सौंदर्य ' या निबंधात ["सौंदर्य आणि साहित्य"] या शब्दशक्तीचे मौलिक विवेचन केले आहे, ते या संदर्भात आठवते. ते सांगतात, शब्द हे वाङ्मयातील परमाणू आहेत. शब्दांच्या या परमाणूंवरच ललित वाङ्मयाची सृष्टी आधारलेली असते. ' शब्दांचे स्वरूप फार नाजुक, फार कोमल असते; आणि तितक्याच नाजुक नि कोमल हाताने ते वापरले तरच त्यांचा कोमलपणा, नाजुकपणा जिवंत राहू शकतो. नाहीतर त्यांच्या कडांचा अलवारपणा विरून जातो... भाषेतल्या निरनिराळ्या शब्दांत भिन्नभिन्न अनुभवांचे नाजुक आकार कोरलेले असतात. ' [ पृ. ९९ ] मर्ढेकरांनी यासाठी ' झाड ', ' भयंकर ', ' लाडका ' या शब्दांची उदाहरणे घेऊन विवेचन केले आहे. शब्दकोश काय करतो ते मर्ढेकरांनी या लेखात सांगितले आहे. ते लिहितात, ' तात्त्विक किंवा शास्त्रीय उपपत्तीत या वास्तव घटना आणि त्यांचे परस्पर संबंध यांचे

स्वरूप तर्कशास्त्र ठरविते. आणि हेच स्वरूप भाषेत शब्दकोश निश्चित करतो. वास्तव घटनेच्या सत्य स्वरूपाची व्याख्या तर्कशास्त्र करते. शब्दकोश भाषेतली तिची व्याख्या देतो. ' ( पृ. १०२ )

मर्ढेकर शब्दांचे दोन वर्ग करतात :( १ ) काही शब्दांत आपल्या प्राथमिक आकारापलीकडे प्रसार पावण्याची जी पात्रता असते, ती जवळजवळ अमर्याद असते. ( २ ) काही शब्द असे असतात की, त्यांच्यात आपल्या प्राथमिक आकारापलीकडे प्रसार पावण्याची जी पात्रता असते ती फार संकुचित असते. कोशामध्ये शब्दांचा संग्रह करणे शक्य आहे; पण शब्दांमधील ही जी प्रसरण पावण्याची शक्ती आहे, ती पकडणे अशक्य आहे.

तात्त्विक दृष्ट्या आणखी असेही म्हणता येईल की, भाषेत शब्दाला पर्याय नसतात. पर्याय म्हणून सांगितलेल्या प्रत्येक प्रतिशब्दात सूक्ष्म का होईना, भिन्न अर्थच्छटा असते. शब्दकोशात शब्दाची व्याख्या, वर्णन, स्पष्टीकरण करता येईल. पण नेमका प्रतिशब्द देता येणार नाही. उदा. ' धम्म–मुकाट; स्तब्ध. ' ( ' अभिनव ' ) पण ' धम्म 'तला भाव ' मुकाट; स्तब्ध 'मध्ये येत नाही हे लक्षात येणारे आहे.

तत्त्वतः याप्रमाणे शब्दकोशाची असंभाव्यता असली, तरी व्यवहारतः त्याची शक्यता, आवश्यकता यांविषयी वाद होण्याचे काहीच कारण नाही. पूर्वापार कोश होत आले आहेत आणि तसे ते व्हावयाला हवेतही. शब्द हे जसे सर्जनाचे एक माध्यम आहे, तसे ते लोकांच्या आपापसातील व्यवहाराचे महत्त्वाचे संवादमाध्यम आहे. संवादासाठी काही एका किमान मर्यादेपर्यंत अर्थनिश्चितीकरण, अर्थाचे साधारणीकरण आवश्यक असते. शब्दकोश हे कार्य साधीत असतो. शब्दकोशाचे एक प्रमुख साध्य भाषेचे अभिव्यक्तिसामर्थ्य कसे वाढेल हे बघणे, शब्दसंग्रह कसा समृद्ध होईल हे बघणे हे आहे. आणखी अनेक प्रकारांनी शब्दकोशाची उपयुक्तता मान्यच होणारी आहे. तो येथे प्रस्तुत, किंवा विवाद्य विषय नाही.

शब्दकोशाचे सर्वांत महत्त्वाचे, गाभ्याचे घटक म्हणजे ( १ ) शब्दसंग्रह, आणि (२) शब्दांचे अर्थ. कोशामध्ये शब्दांचा संग्रह करताना कोणत्या शब्दांचा समावेश करावा, याबद्दलचे धोरण महत्त्वाचे असते. ( १ ) कोशकर्त्याने अस्तित्वात असलेल्या, वर्तमानात प्रचलित, मान्य शब्दांचाच संग्रह करावा का ?

( २ ) वर्तमानात प्रचलित नसलेल्या, पण एकेकाळी वापरात असणाऱ्या, किंवा तुरळक वापरात असणाऱ्या सुंदर, समर्पक शब्दांचाही संग्रह करावा का ? त्यांचे पुनरुज्जीवन करावे का ? उदाहरणार्थ, ' अमृती ' हा मुक्तेश्वराने ' पेला ' या अर्थी वापरलेला शब्द. नष्टप्राय, पण सुंदर, अर्थपूर्ण जुन्य शब्दांचे संशोधन, पुनरुज्जीवन करावे का ? शब्द कसे जन्मतात आणि कसे मरतात हा भाषा–विचारातील स्वतंत्र विषय आहे. जे मेले त्यांची मढी पुन्हा उकरून काढू नयेत असे एक मत आहे; तर माधव जूलियनां-

सारखा कवी ' हिची थोर संपत्ति गेली उपेक्षेमुळे खोल कालार्णवाच्या तळीं । तरी सिंधु मन्थूनि काढूनि रत्नें नियोजूं तयांना हिच्या मण्डनीं.' असे आवाहनपूर्वक म्हणतो.

( ३ ) प्रसारात किंवा अस्तित्वात नसलेल्या नवशब्दांची निर्मिती करून त्याचा समावेश कोशात करावा का ? भाषाशुद्धीसारख्या चळवळीच्या, किंवा पारिभाषिक शब्दांच्या संदर्भात हा प्रश्न विशेषत्वाने येईल. एकेकाळी पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयात भाषाशुद्धीचा पुरस्कार करीत असताना ' कॅरम 'साठी ' टिचकटिकली ' हा शब्द वापरात असल्याची आठवण अलीकडेच ऐकली. अशा शब्दांचा समावेश कोशात करावा का ?

(प्रारंभीच्या संपादकीय निवेदनात डॉ. अग्निहोत्री सांगतात, ' आपण स्वतः इंग्रजी शब्दासाटी एकही मराठी शब्द तयार करावयाचा नाही असे ठरविले होते. असे तयार केलेले कोशातील शब्द ग्रंथांत किंवा व्यवहारात येतीलच असे नाही. उलट ग्रंथांतील अथवा व्यवहारातील शब्दांचे अर्थ व इतर माहिती यासाठीच कोशाची निर्मिती केलेली असते. ' परंतु कधीकधी डॉ. अग्निहोत्रीही काही नवीन शब्द बनवतात. ' टेलिफोनसाठी ते ' शब्दवाहक यंत्र; दूरध्वनिवाहक यंत्र ' हे शब्दही ' दूरध्वनी ' या प्रचलित शब्दाबरोबर देतात. त्यातही क्रमाने ' दूरध्वनी ' हा अधिक प्रसृत शब्द ते तिसऱ्या क्रमाने देतात. जेव्हा सामाजिक व्यवहारामध्ये एखादा नवा आचार, विचार, कल्पना येतात तेव्हा ती संकल्पना व्यक्त करण्यासाठी एकापेक्षा अधिक पर्यायी शब्द व्यवहारात फेकावे लागतात. त्यांतील योग्य त्या शब्दाचा भाषा स्वीकार करते. म्हणून असे अनेक पर्याय प्रारंभकाळात व्यवहारात असणे योग्यच असते. )

( ४ ) फारसे प्रचारात नसलेले, पण सुंदर शब्द आढळल्यास त्यांचा समावेश कोशात करावा का ? शांताबाई शेळक्यांनी एका लेखात ' चिमणचेटके ' हा शब्द आपण कसा अनुभवला हे अतिशय शब्दलोभीपणे सांगितले आहे. दुर्गाबाई भागवतांनी काही शब्दांचा सौंदर्यप्रत्यय नादावलेपणाने उकलून दाखविला आहे. अशा शब्दांचा समावेश कोशात करावा किंवा नाही ?

( ५ ) शब्दकोश हा फक्त वर्तमानकाळी प्रचलित असलेले शब्द व त्यांचे वर्तमानकालीन अर्थ एवढ्यापुरताच बंदिस्त असावा की, त्यामध्ये ऐतिहासिक दृष्टीही असावी ? कालगतीमध्ये कित्येक शब्दांचे अर्थ बदलत जातात, अर्थविकास किंवा अर्थभ्रंश होतो, त्याचीही नोंद कोशात व्हावी का ?

( ६ ) माधव जूलियनांच्या कवितेत ' नहराच्या ओष्ठीं हिरवळ ही मृदु फार ' ( " द्राक्षकन्या " ) अशी ओळ येते, तेव्हा ती समजण्यासाठी ' नहर ' या, एरव्ही क्वचित् वापरात येणाऱ्या शब्दाचा अर्थ समजणे आवश्यक असते. अशा क्वचित् वापरल्या जाणाऱ्या परभाषी शब्दांचा समावेश कोशात करावा का ? ( ' अभिनव ' मध्ये ' नहर ' आहे. )

यातील बऱ्याच प्रश्नांची उत्तरे शब्दकोशाची रचना कुणासाठी, आणि त्याचा उद्देश कोणता या प्रश्नांच्या उत्तरावर ठरतील. एकाच कोशात सर्वच गोष्टी सामावतील अशी शक्यता नाही. यासाठी वेगवेगळे अनेकानेक कोश होणे आवश्यक आहे हेच या प्रश्नांचे उत्तर होईल. लहान लहान, विविध शास्त्रीय अनेक कोश– त्यातून समावेशक बृहत् कोश– पुन्हा नवे विविध शास्त्रीय कोश– त्यातून अधिक समावेशक बृहत् कोश अशी ही सतत चालू राहायला हवी अशी क्रियाप्रतिक्रिया आहे.

शब्दकोशरचनेमध्ये हेही भान ठेवणे अनेक कारणांनी आवश्यक आहे की, शब्दकोश म्हणजे शब्दांची पोतडी नाही; मिळाला शब्द की कोंब, असे नाही. कोश अव्याप्त होऊ नये, तसा तो अतिव्याप्तही होऊ नये. अखेर येथेही संपादकांचे धोरण, तारतम्य याचा भाग येतोच.

शब्दकोशामध्ये शब्द कोणते यावेत याचा थोडा विचार केल्यानंतर प्रश्न येतो, तो हे शब्द कुठून गोळा करायचे ? शब्दकोशाची साधनसामग्री कोणती ? (१) शब्दकोशाचा पहिला आधार अर्थातच त्याआधी प्रकाशित झालेले विविध कोश. नवा बृहत्कोश तयार होताना त्याच्यात त्याआधीचे कोश समाविष्ट व्हावयाला हवेत. आधीच्या कोशांपुढे नवा कोश जावयाला हवा; त्यांच्यांतील अपुरेपणा दूर करून, दोष वगळून, सुधारून, नवी भर घालून नवा कोश झाला पाहिजे. ‘अभिनव’ काही अंगाने ‘महाराष्ट्र शब्दकोशा’च्या थोडा पुढे गेला असला, तरी तो कोश पोटात घेऊन हा कोश वाढला आहे, त्या कोशाची गरज संपलेली आहे असे म्हणता येणार नाही. (२) भाषाशुद्धी-सारख्या चळवळीतून अनेक कोश, किंवा शब्दसंग्रह निर्माण झाले. उदा. सावरकरांचे त्याज्य विदेशी शब्दांचे टाचण ‘शुद्ध–शब्द–कोश’, माधवराव पटवर्धनांचा “भाषा-शुद्धि विवेक”ला जोडलेला ‘बहिष्कार्य शब्दांचा कोश’ अशा विशेष कोशांतील शब्दांचा विचार व्हावयाला हवा. (३) विविध पुस्तकांना, त्या त्या पुस्तकांच्या संदर्भात काही शब्दार्थ–कोश जोडलेले असतात. त्यांचा विचार करायला हवा. उदा. “समग्र माधव ज्यूलियन”ला जोडलेला शब्दार्थ-कोश. (४) प्रकाशित प्राचीन–अर्वाचीन साहित्य हा तर महत्त्वाचा पायाभूत आधार. (५) प्रादेशिक, ग्रामीण, दलित इत्यादी प्रकारच्या ललित वाङ्मयातील शब्द. (६) लोकसाहित्यातील शब्द. (७) ‘महाराष्ट्र साहित्य पत्रिका’, ‘मराठी संशोधन पत्रिका’ अशांसारख्या नियतकालिकातून मधूनमधून शब्दविषयक टिपणे प्रकाशित होतात ती. (८) प्रादेशिक, व्यावसायिक, जातवार, लिंगभेदानुसार बोलीभाषा, वापरात येणारे विशिष्ट शब्द. (९) पारिभाषिक शब्द. (१०) विशिष्ट स्तरात, विशिष्ट काळात काही खास शब्द प्रचारात येतात ते. अशा शब्दांना कोशात स्थान द्यावे की नाही असा एक प्रश्न निर्माण होतो. उदा. माधव जूलियनांच्या ‘विरहतरंग’ मध्ये आलेला ‘मंच्चर’ शब्द (... ‘उद्देशून मला लगेच वदले, “हा घ्या नवा मञ्चर!’ श्लो. ११३). विठ्ठलराव घाटे यांनी सांगितलेला ‘जड्डु’ शब्द (‘दिवस असे होते’, पृ० १०९),

कट्टा, चमचा असे अनेक शब्द. साहित्यात अशा विशिष्ट शब्दांचा प्रवेश झाल्यानंतर ते समजण्यासाठी कोशात त्यांचा अंतर्भाव आवश्यक म्हणावा लागेल; तथापि या बाबतीत काही तारतम्य पाळावे लागेल. यासंबंधात एक धोरण म्हणून असे सुचवता येईल की जे शब्द भाषेत काही काळ स्थिर झाले आहेत, आणि ज्यांचा वापर अगदीच सीमित समूहात नाही अशा शब्दांचे कोशात संकलन व्हावे. असे आणखीही शब्द-कोशाचे आधार सांगता येतील. "महाराष्ट्र शब्दकोशा"च्या पहिल्या विभागाच्या प्रस्तावनेत त्या कोशाच्या सिद्धतेसाठी केवढा व्याप संपादकांनी केला आहे त्याचे निवेदन आले आहे.

डॉ. अग्निहोत्रींच्या "अभिनव मराठी-मराठी शब्दकोशा"च्या निमित्ताने हा काही प्रास्ताविक विचार झाला. या पार्श्वभूमीवर[१] डॉ. अग्निहोत्री यांच्या कोशाची पाहणी करावयाची आहे. ही पाहणी आरंभी म्हटल्याप्रमाणे सम्यक् नाही.

"महाराष्ट्र शब्दकोशा"नंतर गेल्या पन्नास वर्षांत निर्माण झालेल्या सर्व कोशांत हा अत्यंत महत्त्वाचा आहे हे निर्विवाद सत्य आहे. सापेक्षतः खूप व्यापक, समावेशक असा हा आहे. त्याचे श्रेय व महत्त्व हे मान्य करावयालाच हवे. या कोशातल्या मर्यादा, त्रुटी दाखविल्या, तरी त्याच्या या महत्त्वाची जाणीव मनामध्ये आहेच. या मर्यादा, त्रुटी राहतात याचे एक प्रमुख कारण सद्यःपरिस्थितीची पडणारी मर्यादा. असे काम वस्तुतः एकट्याने करणे आज अशक्यप्राय आहे. संघटित स्वरूपात आता असे काम व्हावयाला हवे. या कोशाला पडलेल्या मर्यादांचे एक महत्त्वाचे कारण, ते असे एकट्याने करावे लागले हे आहे. इतरही व्यावहारिक अडचणी, मर्यादा आहेतच. हे सर्व लक्षात घेतले म्हणजे झालेले कामही मोठे आहे असे निःसंदेहपणाने म्हणावेसे वाटते.

सुरुवातीला काही प्राथमिक गोष्टींचा उल्लेख करतो. शब्दकोश, ज्ञानकोश यांसारखे कोश नुसते सहज चाळत बसले, तरी किती मनोरंजन होते, आणि उद्‌बोधन होते, नवी माहिती मिळते! शब्दकोश वाचत राहिल्याने सहजपणे शब्दसंग्रह, शब्दशक्ती वाढत जाते. शब्दशक्ती वाढणे म्हणजे विचारशक्ती वाढणे, संवेदनशक्ती वाढणे. कोशाचा वापर करण्याची प्रवृत्ती वाढायला पाहिजे. दिसते ते हे की, सामान्यतः शब्दकोश, ज्ञान-कोश यांचा वापर करण्याची सवयच सर्वसाधारण लोकांत दिसत नाही. शब्दांतून सहज-पणाने सामाजिक, धार्मिक रूढी, चालीरीती यांची ओळख होते. उदाहरणार्थ, 'तळी'चा एक अर्थ 'ताम्हनात भंडार, कुंकू, विड्याची पाने, खोबऱ्याची वाटी ठेवून तीन किंवा अधिक वेळा खंडोबाचे भक्त 'खंडोबाचा येळकोट' असे म्हणून उचलून कपाळाला

---

[१] हा 'पार्श्वभूमि' शब्दच "महाराष्ट्र शब्दकोशा"त नाही, आणि "अभिनव" मध्येही नाही. वा. गो. आपट्यांच्या Sanskrit English Dictionary मध्येही तो नाही. या शब्दाचा वापर चुकीचा केला जातो; पण आता तो रूढीने पूत झाला आहे.

लावतात तो विधी.' त्याचा दुसरा अर्थ, 'नवरात्राच्या दिवसांत नवविवाहित वधूकडे वराकडील लोक ताटात साडी, चोळी, हळदीकुंकू व फराळाचे पदार्थ घालून पाठवितात तो ब्राह्मणेतरांतील रूढ विधी.'

अलीकडे शब्दकोशांचे स्वरूप केवळ शब्दाचे अर्थ देण्यापुरतेच मर्यादित राहिलेले नाही. त्यात अर्थाबरोबरच संबंधित थोडी अधिक माहिती देण्याचीही प्रवृत्ती आली आहे. शब्दकोश व ज्ञानकोश यांच्या अंशतः सामिलीकरणाची आधुनिक प्रवृत्ती आहे. त्याचे असे एखादे उदाहरण याही कोशांत दिसते.

एक 'तोंड' शब्द घेतला, तरी त्याचे किती अर्थ, त्या शब्दापासून साधलेले किती शब्द, शब्दप्रयोग (भाग ३, पृ. ११४–१२९)! 'पाणी' या शब्दाशी संलग्न शब्द, शब्दप्रयोग भाग ३ मध्ये पृ. ११५ पासून ११९ व्या पृष्ठापर्यंत आले आहेत.

मुळामध्ये शब्दकोश तयार करताना शब्द म्हणजे काय, मराठी शब्द कोणते यासंबंधीच्या कल्पना स्पष्ट व्हायला हव्यात. डॉ. अग्निहोत्रींच्या यासंबंधीच्या कल्पना स्पष्ट झाल्यासारख्या वाटत नाहीत. ते 'सहा महिन्यांची जांभई' हा वाक्प्रचार स्वतंत्र शब्द म्हणून देतात. खरे तर हा 'शब्द' नव्हे. (महाराष्ट्र शब्दकोशामध्ये हा वाक्प्रचार आहे; पण तो स्वतंत्र शब्द म्हणून न येता, 'सहा' या शब्दाच्या अंतर्गत येतो. येथेही कदाचित् तसेच अभिप्रेत असेल. हा मुद्रणदोषही असू शकेल. पण असे होऊ नये यासाठीच कोशाचे मुद्रणही अतिशय काटेकोरपणाने व्हायला हवे.)

मराठी शब्दांची निवड, समावेश याबाबतीतही असेच म्हणता येईल. कोशात ज्यांचा समावेश केलेला आहे, त्यांतील काही शब्दांना मराठी म्हणता येणे कठीण आहे. कोट, टेबल अशांसारखे इंग्रजी शब्द मराठी झाले असे मानून त्यांचा कोशात समावेश करणे रास्त होईल. पण डॉ. अग्निहोत्री अशा अनेक इंग्रजी शब्दांचा कोशात समावेश करतात की, जे प्रचारात सहजतेने नाहीत. ॲक्वायर, ॲक्शन, अडज्युटंट, ॲप्रेंटिस, ग्यारिसन, बाय, बाथरूम, बाथसोप, मनी यांसारखे अनेक इंग्रजी शब्द या मराठी कोशात येतात. शब्दांचे अर्थ देतानाही डॉ. अग्निहोत्री इंग्रजी शब्दांचा वापर करतात. 'ॲक्शन'चा एक अर्थ ते 'पार्ट' असा देतात; 'गुप्त'चा confidential असा अर्थ देतात.

फार्सी, अरबी शब्दही, जे मराठीत फारसे प्रसारात नाहीत असे ते देतात. उदाहरणार्थ, य(ये)कीन, यगानगत, यजीतखत, यजीदखत, आयंदा. ('यंदा' शब्द कोशात आहे. तेथे त्याची व्युत्पत्ती 'फा. आयंदा' अशी नमूद केली आहे. तेवढे पुरे होते.)

डॉ. अग्निहोत्रींनी या कोशाचा मुख्य आधार म्हणून "महाराष्ट्र शब्दकोशा"चा बराच उपयोग केलेला दिसतो, आणि ते साहजिकच आहे.[२] त्या कोशातील बरेच

२ 'महाराष्ट्र शब्दकोश' व 'अभिनव' यांची तुलना करून पहिल्यातील कोणते शब्द, अर्थ वगळले, कोणते नव्याने घातले याची नोंद तपशिलाने घेण्यासारखी आहे. मात्र प्रस्तुत परीक्षणलेखात तशी नोंद घेण्याचा उद्देश नाही.

शब्द या कोशात समाविष्ट आहेत. पण त्या कोशातले काही शब्द यात वगळले; काही शब्दांच्या तेथील अर्थांतील काहीच अर्थ येथे नमूद केले, अर्थ देताना काही ठिकाणी त्यांच्या क्रमात बदल केला. हे असे का केले, त्यामागचे धोरण काय हे मात्र स्पष्ट होत नाही. कोशामध्ये शब्दाचे अर्थ देताना ते देण्यामध्येही काही क्रम असावयाला हवा. महत्त्व, प्रचलितता यांच्या उतरत्या क्रमाने हे अर्थ यावेत अशी अपेक्षा असते.

"महाराष्ट्र०" मध्ये 'पकटी'चे अर्थ असे दिले आहेत. १. (को.) मधाच्या पोळयातील सुका मेणाचा भाग; पाकडी पहा. २. (दादर) भाग; तुकडा. ३. (दादर) बंदराचे एक टोक. "अभिनव" मध्ये पहिला अर्थ गाळला; दुसरा व तिसरा अर्थ घेतला; पण ते अर्थ देताना '१. बंदराचे एक टोक. २. भाग; तुकडा. असा क्रम बदलला.

'वग' शब्दाचे "अभिनव" मध्ये "महाराष्ट्र०" तीलच काही अर्थ दिले आहेत, काही गाळले आहेत. "महाराष्ट्र०"तील 'वग'चे अर्थः १. कृपादृष्टी; मेहेरबानी; आश्रय (मोठ्या लोकांचा) २. ओळख देख; स्नेहभाव; शरीरसंबंध; वळण (अगत्यवाद पडण्याजोगे). ३. वशिला; शिफारस. ४. प्रतिष्ठा; पत. पुढे वगवशिला, वगवसीलत हे साधित शब्दही दिले आहेत.

"अभिनव०" मध्ये १. (मोठ्या लोकांची) कृपादृष्टी, आश्रय. २. परिचय; स्नेहभाव. ३. वळण; वशिला; शिफारस. ४. पत; प्रतिष्ठा असे अर्थ "महाराष्ट्र०" मधीलच आहेत. पण त्यातलेच काही अर्थ गाळले, काहींचा क्रम बदलला. असे का केले असावे हे मात्र ध्यानी येत नाही.

या कोशरचनेमागे काही ठिकाणी निश्चित धोरण असावे असे दिसत नाही. त्यामुळे त्यात काही विसंगती, किंवा अपुरेपणा आलेला आहे. 'माननीय'शब्द 'मान'पासून बनलेला. 'मान'शब्दाच्या अंतर्गत तो द्यावयाला हवा होता. "महाराष्ट्र शब्दकोशा"त 'मानधन', 'माननीय' हे शब्द 'मान' शब्दान्तर्गतच दिले आहेत. "महाराष्ट्र शब्दकोशा"मध्ये 'पूज्य; मान्य; विश्वासार्ह; मान देण्यास, विश्वास ठेवण्यास, मान्य करण्यास योग्य (व) मानधारी.' एवढाच अर्थ दिला आहे. तो पुरेसा आहे. "अभिनव०" मध्ये 'आदरणीय. (इं) Honourable असे अर्थ देऊन पुढे 'माननीय अर्थमंत्री,... माननीय...' अशी मंत्र्यांची यादी दिली आहे. अशा यादीचे काहीच प्रयोजन नाही. डॉ. अग्निहोत्रींच्या पुढे कोशाची व्यावहारिक उपयोगिता वाढावी असा एक उद्देश असावा, आणि त्यातून अशा याद्या आल्या असाव्यात. (इंग्रजी शब्दांचाही अधिक अंतर्भाव याच उद्देशातून झाला असावा. पण कोशकारांनी आपल्या मूळ उद्देशापासून असे सरकण्याचे काही कारण नाही.)

डॉ. अग्निहोत्रींनी क्वचित् शब्दार्थाचा ऐतिहासिक विकासक्रम सांगितला आहे. उदा. 'चिंतांक– मराठे लोकांच्या स्त्रियांच्या गळयात घालण्याचा एक सुवर्णालंकार.

आठव्या शतकात हा शब्द कमरेच्या साखळीचा वाचक होता. पण सोळाव्या शतकापासून त्याला हल्लीचा अर्थ आला.' पण सर्वत्रच ते असा ऐतिहासिक विकासक्रम सांगत नाहीत.

कोशात शब्दाचे अर्थ देताना ज्या शब्दांचा उपयोग केलेला असेल, त्या शब्दांचा समावेश व त्याचा अर्थ कोशात असावा ही अपेक्षा साहजिकच आहे. परंतु येथे, एखाद्या शब्दाचा अर्थ देण्यासाठी ज्या शब्दांचा उपयोग केलेला असेल, त्या शब्दांचा अर्थ आला आहेच असे नाही. 'काचोळी' शब्दान्तर्गत 'काचोळीपंथ' या शब्दाचा अर्थ 'घटकंचुकी नावाचा शाक्त पंथ' असा दिला आहे. पण 'घटकंचुकी' शब्द कोशात नाही.

काही शब्दांचे अर्थ अपुरे किंवा चुकीचे दिले आहेत. उदा. 'अपघात– १. आकस्मिक मरण, मरण्यास कारण होणारी आकस्मिक घटना, गोष्ट. २. त्रागा. (इं) 'Accident'. 'अपघाता'त हे सर्वच अर्थ येतात असे नाही; आणि याशिवाय आणखी अर्थ उरतातही. 'ॲक्सिडेंट' हा शब्द मराठीत बराच रुळला असल्याने अर्थासाठी तो द्यावयाला हरकत नाही. पण तो रोमन लिपीत न देता देवनागरी लिपीत दिला असता तर त्याचे परकीयपण कमी झाले असते.

काही प्रचलित शब्द यामध्ये नाहीत. 'अंग' साधित अनेक शब्द कोशात आहेत; पण 'अंगवस्त्र' नाही. 'अजून' या क्रियाविशेषणाचा समावेश आहे; पण 'अ-जून' असा त्या शब्दावर श्लेष करून 'जरी वयाने वृद्धत्व आले, तरी वृत्तीने वार्धक्य न आलेला' अशा अर्थाने त्याचा वापर केला जातो, तसा अर्थ नाही. (असे श्लिष्ट अर्थ कोशात यावेत का ? त्याच्या स्वरूपमर्यादेत ते बसतील का ? असा प्रश्न निर्माण होऊ शकेल.) 'किडामाकोडा (< म. किडा + माकोडा)– एखादा क्षुद्र व बारीक जीव; किडे; आळ्या इ.' असा शब्द, अर्थ आहे. 'माकोडा'चाही 'मुंगळा' हा अर्थ आहे. पण 'मकोडा'चा अर्थ 'फाकडू' एवढाच आहे. 'मकोडा'चाही 'क्षुद्र जंतु, किडा' असा अर्थ आहे, तो येथे नाही. ('उंबरातले किडेमकोडे उंबरि करिती लीला.'– ग. दि. माडगूळकर)

'दिंडीचे इतर अनेक अर्थ दिले आहेत. पण '१९ मात्रांचा, चरणातील अनिश्चित अक्षरसंख्येचा विशिष्ट जाति-छंद प्रकार' हा महत्त्वाचा अर्थ दिलेला नाही.

'कारा' (लग्न न झालेला पुरुष) हा भालचंद्र नेमाड्यांच्या कादंबरीत येणारा शब्द, खानोलकरांच्या "चानी" कादंबरीमुळे विशेष परिचित झालेला 'चानी' (खार) शब्द असे यात नाहीत. (डॉ. अग्निहोत्रींचा आधुनिक मराठी साहित्याशी फारसा परिचय नसावा. या साहित्यात आलेले अनेक शब्द या कोशात आढळत नाहीत.)

अलीकडच्या काही वर्षांत 'लाचार, तोंडपुजा, स्तुतिपाठक' अशा अर्थाने विशेष प्रचारात असलेला चमचा शब्द यात नाही.

अर्थात् शब्दांची निवड, त्यांचा प्रत्यक्ष कोशात समावेश याला व्यावहारिक अडचणीही आल्या असणे शक्य आहे. अनेक शब्द निवडूनही व्यावहारिक मर्यादांमुळे त्यातीलकाही वेचून बाजूलाही काढावे लागले असतील. अनेक तऱ्हेच्या प्रतिकूलतेतून डॉ. अग्निहोत्रींना मार्ग काढावा लागलेला असल्यानेही कोशाला या मर्यादा पडल्या असणे शक्य आहे. दाते-कर्वे यांच्या " महाराष्ट्र शब्दकोशा "ला अर्धशतक उलटले. या कालावधीत इंग्रजी व अन्य भाषांतील, तसेच शासकीय व ग्रामीण वाङ्मयातील रूढ झालेले शब्द, आणि ज्या अनेक शब्दांना नवीन अर्थ प्राप्त झाले, त्या सर्वांची दखल संपादकांनी संक्षेपाने घेतल्याचे कोशाच्या मलपृष्ठावरील पाठराखणीत म्हटलं आहे. ( 'Blurb' साठी सुचवण्यात आलेला एक सुयोग्य शब्द. पण कोशात तो नाही. ) पण गेल्या पंचवीस-तीस वर्षांत साहित्याच्या वाढीचा वेग, वेगवेगळ्या प्रांतिक, प्रादेशिक, जातीय, व्यावसायिक बोलींतील शब्दांचा भाषेत वाढता प्रवेश किंवा निर्मिती यांची बरोबरी एकटा कोशकार, मर्यादित साधन-सामग्रीनिशी करणे प्रायः अशक्य आहे. पाचव्या भागातील प्रकाशकीय हृद्गतात प्रकाशकांनी ' या कोशाची मुद्रणप्रत १९७६ मध्ये पूर्ण झाल्यामुळे १९७५ पर्यंतचे शब्द यामध्ये आले आहेत. त्यानंतर मराठी भाषेत आलेल्या शब्दांची पुरवणी लवकरच प्रसिद्ध होईल. ' असे म्हटले आहे. [ १ जानेवारी १९८६. प्रकाशकीय पृष्ठावर मात्र या भागाचा प्रकाशन-काल ऑक्टोबर १९८५ दिला आहे.] प्रकाशकांचा हा संकल्प लवकर पुरा व्हावा !

शब्द व अर्थ याशिवाय कोशाची व्याकरण, व्युत्पत्ती, उदाहरण अशी आणखीही अंगे असतात. शब्दाचे व्याकरण व आवश्यक तेथे शब्दांची व्युत्पत्ती डॉ. अग्निहोत्रींनी दिली आहे. व्युत्पत्तीसंबंधाने काही मतभेद निर्माण होऊ शकतील. ' प्यार [<सं.प्रियकर]' ' प्यास [<सं. पिपासा] ', ' प्यादा [<सं. पदाति]' अशा व्युत्पत्ती दिल्या आहेत. परंतु हे शब्द फार्सीतून मराठीत आलेले आहेत. ' प्यादा 'ची व्युत्पत्ती ' पियादा ' या फार्सी शब्दापासून " फार्सी-मराठी कोशां "त दिली आहे.

शब्दाचे सामान्य रूप व अनेकवचनी रूपही डॉ. अग्निहोत्रींनी दिले आहे. हे एक कोशाचे वैशिष्ट्य.

शब्दांच्या वापराची उदाहरणे मात्र या कोशात दिलेली नाहीत. शब्दाचा नेमका अर्थ, त्याच्या विविध अर्थच्छटा, त्याचे कालौघात होत आलेले अर्थपरिवर्तन समजण्यासाठी शब्द वापराची उदाहरणे आवश्यक असतात. (" महाराष्ट्र शब्दकोशा "त अशी उदाहरणे दिलेली आहेत.) ही एक या कोशाची महत्त्वाची उणीव. ( याचेही कारण पुन्हा आर्थिक. )

" अभिनव मराठी-मराठी शब्दकोशा "चे आजवरच्या इतर कोशांपेक्षा महत्त्वाचे वैशिष्ट्य व अभिनवत्व यात आहे की, यात शब्दांचे उच्चार दिले आहेत. शब्दांचे उच्चार देणारा हा मराठीतील पहिलाच शब्दकोश. सुरुवातीच्या काळात उच्चार देण्याची

फारशी गरज भासली नसावी. पण आज असे उच्चार देण्याची निश्चितच आवश्यकता मराठी बोलणाऱ्यांसाठीही आहे. आकाशवाणी, दूरदर्शनवरील बोलणारे उच्चारांचे काय हाल करीत असतात ते ऐकले म्हणजे उच्चार देण्याची निकड ताबडतोबच पटते. (अर्थात् ही मंडळी कोशाकडे वळतील ही अपेक्षा फारच झाली!) "मराठी वर्णोच्चार विकास" हा डॉ. अग्निहोत्रींचा पीएच.डी.चा प्रबंध आहे. (प्रकाशन १९६३) त्यांच्या त्या अभ्यासातच या कोशाची बीजकल्पना असावी. ज्या शब्दांचे उच्चार त्यांच्या लिखित रूपांहून भिन्न आहेत, त्या सर्वांचे उच्चार त्या शब्दांपुढे दिले आहेत. 'आजच्या बहुसंख्य सुशिक्षितांना संस्कृत भाषेचा गंधही नाही. त्यांचे उच्चार विचारात घेऊन या या कोशात शब्दांचे प्रमाण उच्चार दाखविलेले आहेस.' हे उच्चार निश्चित करणे, वा लिपीद्वारे नेमके दाखवणे हे अवघडच आहे, आणि ते विवाद्य होण्याचाही संभव आहे. प्रांत, जात, व्यवसाय, वय, लिंग, शिक्षण अशा वेगवेगळ्या कारणांनी उच्चार वेगवेगळे होण्याची शक्यता असते. शिवाय वैयक्तिक लकबींचाही त्यात भाग असतोच. उच्चार-शास्त्र हीही भाषाविज्ञानाची एक स्वतंत्र शाखा आहे. महादेव मोरेश्वर कुंटे, माधवराव पटवर्धन यांनी उच्चार व त्याचे लेखन यांतील अंतर कमीं करण्याचा प्रयत्न केला. पण त्याने फारसे मूळ धरले नाही. डॉ. अग्निहोत्रींनी या कोशात उच्चार व त्यांचे लेखन यांतील अंतर साधण्याचा प्रयत्न केला आहे. मात्र हे उच्चार दाखविताना त्यांनी आंतर-राष्ट्रीय स्वनलिपीचा (उच्चारदर्शक संकेतांचा) वापर केलेला नाही. त्यांनी सोप्या, सुटसुटीत, सामान्यांना सहज आकळतील अशा चिन्हांचा वापर केला आहे. 'शब्दाचे स्वराघात दर्शविण्यासाठी ज्या अक्षरांचा उच्चार किंचित लांब (दीर्घ सदृश) होतो त्या अक्षरावर एक आडवी रेघ (–) दिली असून ऱ्हस्वसदृश किंवा निभृत उच्चार दर्शविण्या-साठी अक्षराच्या डोक्यावर एक उभी रेघ (।) दिली आहे.' (संपादकीय निवेदन) मात्र काही ठिकाणी उच्चार दाखविणे आवश्यक असूनही ते दाखवायचे राहिले आहेत. 'हव्य'चा 'हव्व्य' असा उच्चार दाखविला आहे; पण 'हव्यास'चा 'हव्व्यास' हा हा उच्चार मात्र निर्दिष्ट केला नाही.

शब्दांचे उच्चार दाखवताना त्याचे घटक फोडून दाखविणेही जरूर असते. ते या कोशात तसे सर्वत्र फोडून दाखविले आहेत असे नाही. उदा. 'चर्ढतान्वयं', 'श्वाशकट' [सं. <श्वन्, श्वा–हा शब्द मराठी आहे का? आणि 'श्वाशकट' ही कल्पना मराठीत आहे का? "महाराष्ट्र शब्दकोशा"त हा साधित शब्द दिलेला नाही]

प्रत्यक्ष शब्दकोशाशिवाय पहिल्या भागाच्या आरंभी (१) आदर्श मराठी शब्दकोश कसा असावा? (२) मराठी शब्दांचे प्रमाणित उच्चार, (३) मराठीच्या प्रमुख बोली व त्यांची उच्चारवैशिष्ट्ये हे तीन निबंध डॉ. अग्निहोत्रींनी जोडले आहेत. पाचव्या भागात शब्दकोश पुरा झाल्यावर एकूण २९ परिशिष्टे जोडली आहेत. (पृ. ३३१–६५०). त्यांतील अखेरची तीन परिशिष्टे विशेषनामे, प्राचीन भारतातील भौगोलिक

प्रदेश नावे, व मराठी साहित्यातील प्रमुख अलंकार यांची आहेत; तर आधीची सव्वीस परिशिष्टे सामान्य सुशिक्षितांच्या दैनंदिन व्यवहाराला आवश्यक अशा भिन्नभिन्न शास्त्रातील इंग्रजी शब्दांना समर्पक अशा मराठी शब्दांची आहेत. इ. स. १९३० नंतर व्यवहाराच्या वाढत्या व्यापाबरोबर मराठीत रूढ झालेल्या इंग्रजी शब्दांचा किंवा त्या शब्दासाठी रूढ झालेल्या नव्या समानार्थी मराठी प्रतिशब्दांचा समावेश आहे. त्यांतील सतरावे परिशिष्ट वाङ्मयाच्या परिभाषेचे आहे. ( पृ. ५३८-५४२ ) एक तर अशा मूलतः शब्दकोशाला जोडलेल्या पारिभाषिक शब्दांच्या परिशिष्टात अपुरेपणा राहाणे अपरिहार्य आहे. कारण असा संज्ञाकोश हा स्वतंत्रच विषय आहे; तो परिशिष्ट म्हणून पर्याप्त होणे शक्य नाही. आणि दुसरे, या परिशिष्टात दिलेले काही अर्थ चुकीचेही आहेत. उदाहरणे Ballad = पोवाडा; खंडकाव्य; Composition = निबंध; Essay = लघुनिबंध; Lyric = वीणाकाव्य, खंडकाव्य; Melodrama = भयांतिका; Playback = पार्श्वगायक ( हा शब्द वाङ्मयाच्या पारिभाषिक परिशिष्टात येण्याचेही कारण नाही. मुद्रणदोषही असू शकेल. ); Comitragedy = सुखदुःखान्तिका; Tragicomedy= सुखान्तिका; Corroboration, Maxims, Poetic Generalization या तीनही संज्ञा ' अर्थान्तरन्यास ' या एकाच शब्दासाठी दिल्या आहेत.

विशेषतः कोशासारख्या ग्रंथाचे मुद्रण अतिशय शुद्ध, काटेकोर, काळजीकाळ्याने केलेले असावयाला हवे. परंतु या कोशाच्या मुद्रणात काहीशी अशुद्धता राहिली आहे. अर्थोपलब्धीस, शब्द शोधण्यास काही वेळा अडथळा येतो. उदा. ' पईज, पईल, पईस, इत्यादी शब्द देऊन त्यापुढे ते ' प ' मध्ये पहा असे म्हटले आहे. वस्तुतः तेथे ' पै 'मध्ये पहा असे हवे. ( इथेही पुन्हा व्यावहारिक अडचणी असणार. )

अर्थात् अशा कोशाला मर्यादा या असतातच. ही मर्यादा मुख्यतः आर्थिक, व्यावहारिक अधिक पडते. तिथेच आपण येऊन पोचतो. कोशाचे काम निरनिराळ्या मुद्रणालयात, दीर्घ कालावधीत करून घ्यावे लागले, त्याचेही अटळ परिणाम कोशाच्या स्वरूपावर झाले आहेत. या मर्यादा असतातच; पण म्हणून या अशा कामाचे मोल उणावत नाही. जो अशा जातीचे लहानमोठे काम करतो, त्यालाच अशा कामातील अडचणी, कष्ट, व्याप, चिकाटी यांची थोडीफार कल्पना येईल. डॉ. अग्निहोत्रींना आदर्श शब्दकोश कसा असावा याची जाण चांगली आहे. त्यांनीच कोशाच्या पहिल्या भागातील एतद्विषयक निबंधात लिहिले आहे, ' आदर्शाला सर्वच क्षेत्रात वास्तवाच्या मर्यादा पडत असतात तशाच कोशाच्या बाबतीत देखील पडतात; आणि मराठी कोशाच्या बाबतीत तर त्या अधिकच पडतात. ' ' आदर्श कोशनिर्मितीच्या प्रयत्नाला मुख्य मर्यादा आहे ती आर्थिक. ' सर्वांगपरिपूर्णता हा आदर्श; त्या आदर्शाच्या दिशेने किती वाटचाल केली हे महत्त्वाचे.

वेगवेगळ्या उद्दिष्टांनी, विविध स्वरूपाचे अनेकानेक कोश व्हावयास हवे आहेत. पण

असा एक कोश होता होताच ' महाराष्ट्र शब्दकोशा 'नंतर पन्नास वर्षे उलटून गेली. तो तयार होऊन प्रकाशित होण्यातही कित्येक वर्षे उलटून गेली. त्याचा उटाव होऊन पुन्हा अशा प्रकारचे आणखी प्रगत काम कधी होणार ? एवढ्या दूरपल्ल्यावर दृष्टी टाकायलाही मन धजत नाही. अखेर हेच खरे, जशी संस्कृती, तसे कोश मिळतात.

" अभिनव मराठी–मराठी–शब्दकोश " हे एक मोठेच काम झाले. असा समावेशक बृहत्कोश तर व्हावयाला हवाच. पण आज आणखी निकड भासते, ती सर्वसामान्य वाचकांच्या, लोकांच्या सर्वसाधारण गरजा भागवणाऱ्या आटोपशीर, सुटसुटीत, प्रमाण, आणि त्यांच्या खिशाला परवडणाऱ्या शब्दकोशाची. असा शब्दकोश व्हावयाला हवा आहे.

एका व्यक्तीने, अपुऱ्या साधनसामग्रीनिशी, आयुष्याच्या उत्तरार्धात केलेल्या अशा बृहत्कोशकार्याला काही अंगभूत मर्यादा असल्या, तरी त्या कार्याचे, त्यामागील प्रेरणेचे, निष्ठेचे मोल उणावत नाही. आपला हा कोश ही जनसेवा आहे या भावनेने डॉ. अग्निहोत्री यांनी हे काम केलेले आहे. कोशाच्या अर्पणपत्रिकेत त्यांची ही भावना उत्कटपणे व्यक्त झाली आहे. ' ज्या अज्ञात, प्रेरक शक्तीने हे नवनिर्मितीचे कार्य करण्याची प्रेरणा मला दिली व ते पार पाडण्याचे सामर्थ्यही दिले, तिच्या चरणी ही जनसेवा विनम्रभावे अर्पण. ' ही जनसेवा त्या शक्तीच्या चरणी रुजू व्हावी, ज्या जनांसाठी हे एवढे कार्य केले, त्या जनांमध्ये कोशाचा वापर करण्याची अधिकाधिक सवय, वृत्ती निर्माण व्हावी, यापरती आणखी कोणती अपेक्षा व्यक्त करणार ?

**मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७**

**अधिकृत इन्कार**

● " त्याचं काय आहे, आपण अगदी सर्वसाधारण विधान केलं ना तरी बायका ते स्वतःला लावून घेतात. "

" मी नाही बाई त्यातली ! "

● " तुम्ही आपल्या मित्राला लिहिता की सरकारकडून पत्रे फोडून वाचली जातात म्हणून मी तुला अधिक लिहीत नाही. तुम्हाला चुकीची माहिती मिळालेली दिसते, सरकारकडून कधीच पत्रे फोडून वाचली जात नसतात याची कृपया नोंद घ्यावी. आपला विश्वासू ..."

# मराठीतील भाषाविषयक लेखन १९८६

मराठीमधले भाषाविषयक लेखन १९८५/ भाषा आणि जीवन / ४:१/हिवाळा १९८६.

आचार्य माधव ना. / आपण ह्यांना ओळखलंत का ? / भाषा आणि जीवन / ४:१/ हिवाळा १९८६.

आचार्य माधव ना. / रूपकांच्या विळख्यात / भाषा आणि जीवन/ ४:४/दिवाळी १९८६.

आचार्य माधव ना. / समासोक्ती / भाषा आणि जीवन / ४:२ / उन्हाळा १९८६.

एडके सुनंदा / मराठी भाषेमधील १ ते ४ इयत्तांची मूलबद्ध श्रेणीबद्ध शब्दसंपत्ती / साहित्यसूची / वर्ष ७ अंक ५ / जून १९८६.

ओंकार भय्यासाहेब / मराठी हस्तलिखित ग्रंथांचा प्रपंच / भाषा आणि जीवन / ४:४ / दिवाळी १९८६.

काळे अक्षयकुमार / एका उचित धाडसाचे स्वागत (पुस्तक परीक्षण) / परीक्षित ग्रंथ– कवितारती वर्ष १ : अंक १ नोव्हें–डिसें. १९८५ / भाषा आणि जीवन / ४:२ / उन्हाळा १९८६.

काळे कल्याण / भाषिक स्वातंत्र्य आणि भाषावार प्रांतरचना ( रा. श्री. जोग ) या लेखा-वरील टिपण / भाषा आणि जीवन / ४:३ / पावसाळा १९८६.

काळे कल्याण / मराठीचं शुद्धलेखन (संपादकीय) / भाषा आणि जीवन / ४:१ / हिवाळा १९८६.

किर्लोस्कर मालती शं. / आरसे-पण पारा उडालेले (ज्याची त्याची प्रचीती) / भाषा आणि जीवन / ४:१ / हिवाळा १९८६.

कुलकर्णी भीमराव / मराठी मरणार काय, तरणार कशी ? / रविवार सकाळ / १९८६. ६.२२.

कुलकर्णी भीमराव / मरू घातलेली माय मराठी / विवेक / जानेवारी १९८६.

कुलकर्णी व. दा. / ‘ वस्त्राहरणा ’तील अर्थप्रपंच / भाषा आणि जीवन / ४:१ / हिवाळा १९८६.

कुलकर्णी विरूपाक्ष / शब्दांच्या दुनियेत ( भाषानिरीक्षण) / भाषा आणि जीवन / ४:३/ पावसाळा १९८६.

केळकर अशोक रा. (अनुवादक ) / कविता अनुवाद म्हणजे (वसा आंतरभारतीचा ) / मूळ मल्याळम कवी : कु. सच्चिदानंद/भाषा आणि जीवन/४:३ / पावसाळा १९८६.

केळकर अशोक रा. / लेखनविवेक : स्वल्पविराम आणि समयोगी रचना (भाषाविवेक) / भाषा आणि जीवन / ४:१ / हिवाळा १९८६.

केळकर य. न. / शब्दांचे बदाम / साहित्य सहवास स्मृतिगंध ८६ / दिवाळी १९८६ / (डेक्कन जिमखाना रहिवासी सांस्कृतिक मंडळ, पहिला वार्षिक साहित्य सहवास स्मृति गंध – दिवाळी विशेष अंक : संपा. वसंत जोशी, डे. जि. हौ. सोसायटी हॉल ) पुणे ४११००४.

खेर अंजनी (अनुवादिका) / भाषांतर : छायानुवाद की भावानुवाद ? / मूळ लेखिका : गौरी देशपांडे / भाषा आणि जीवन / ४:१ / हिवाळा १९८६.

गोखले द. न. / मराठीला लाभलेला एक अनन्वय अलंकार ( भाषापरीक्षण ) / परीक्षित ग्रंथ – डॉ. बाबासाहेब आंबेडकर ( भालचंद्र फडके ) / भाषा आणि जीवन / ४:१ / हिवाळा १९८६.

गोखले प्रदीप प्र. / आस्तिक नास्तिक (अर्थरूपायण) / भाषा आणि जीवन / ४:२ / उन्हाळा १९८६.

चव्हाण देवीसिंग / लकुचस्तनी राधा / प्रतिष्ठान / मार्च-एप्रिल-मे-जून १९८५.

जोग रा. श्री. / भाषिक स्वातंत्र्य आणि भाषावार प्रांतरचना ( पुनर्भेट ) / भाषा आणि जीवन / ४:३ / पावसाळा १९८६.

जोगळेकर सुषमा / तरच विद्यार्थी काव्याभिमुख होऊ शकतील / भाषा आणि जीवन / ४:४ / दिवाळी १९८६.

जोशी रा. भि. / संस्कृत भाषेतील संख्यावाचक शब्द / नवभारत / जुलै १९८६.

टिळक बाळ गंगाधर / प्रो. रानडे यांचा नवा इंग्रजी–मराठी कोश ( पुनर्भेट ) / भाषा आणि जीवन / ४:२ / उन्हाळा १९८६.

तेंडुलकर रमेश / प्रतिमांची मुशाफरी ( साद आणि प्रतिसाद ) / भाषा आणि जीवन / ४:२ / उन्हाळा १९८६.

देव विजया / भाषेचे द्रव्य आणि ‘ सत्तांतर ’चा रंग व पोत ( भाषा निरीक्षण ) / भाषा आणि जीवन / ४:४ / दिवाळी १९८६.

देशपांडे गौरी / भाषांतर : छायानुवाद की भावानुवाद / अनुवादिका : अंजनी खेर / भाषा आणि जीवन / ४:१ / हिवाळा १९८६.

देशपांडे सुधाकर शं. / रसातळची मराठी भाषा (साद आणि प्रतिसाद ) / भाषा आणि जीवन / ४:२ / उन्हाळा १९८६.

धोंगडे रमेश वा. / नैसर्गिक विज्ञान, सामाजिक विज्ञान आणि भाषाविज्ञान / परामर्श / खंड ८, अंक २ / ऑगस्ट १९८६.

धोंगडे रमेश वा. / भावबंधन : वैधर्म्यांची समांतर रचना / नवभारत / मार्च १९८६.





अनुक्रमणिका

धोंगडे रमेश वा. / मराठी साहित्य, समीक्षा आणि नव्या वाटा / महाराष्ट्र साहित्य पत्रिका अंक २३७ / जानेवारी–मार्च १९८६.

धोंगडे रमेश वा. / श्री. म. माटे आणि भाषा / महाराष्ट्र साहित्य पत्रिका / अंक २३८ / जुलै–सप्टेंबर १९८६.

निमकर श्रीधर / उच्चारांचे गुलाम / लोकसत्ता / १९८६. ११.१६.

निमकर श्रीधर / संस्कृत भाषेचे शिक्षण / भाषा आणि जीवन / ४:१ / हिवाळा १९८६.

नेमाडे भालचंद्र / साहित्याची भाषा / अनुष्टुभ/मे–जून १९८६; तसेच, आलोचना / २४:९ / मे १९८६.

पठाण यू. म. / मराठवाड्यातील प्राचीन मराठी शिलालेख / पंचधारा / वर्ष २९ वे, अंक २ रा / जुलै–सप्टेंबर १९८६.

पदकी सरिता / ऑफिसातली टीकाटिप्पणी : भाषेतील बदल, बायकांच्या बाबतीत (दखलपात्र) / भाषा आणि जीवन / ४:२ / उन्हाळा १९८६.

परदेशी बाबुलाल / जोड–असर (दखलपात्र) / भाषा आणि जीवन / ४:३ / पावसाळा १९८६.

पंतोजी (कृ. श्री. अर्जुनवाडकर) / कंप्यूटरवर मराठी : 'हा सूर्य, हा जयद्रथ!' (गमभन) / ललित / एप्रिल १९८६.

पंतोजी (कृ. श्री. अर्जुनवाडकर) / काही उत्तरं, (गमभन) / ललित / जुलै १९८६.

पंतोजी (कृ. श्री. अर्जुनवाडकर) / नारद आणि मराठी लेखक (गमभन) / ललित / ऑक्टोबर १९८६.

पंतोजी (कृ. श्री. अर्जुनवाडकर) / मराठी भेळ (गमभन) / ललित / जानेवारी १९८६.

पारसनीस न. रा. / मराठी असे आमची मायबोली / शिक्षणसमीक्षा / एप्रिल–मे १९८६.

पुरी अरुण / आदर्श पत्रकारिता कशी करावी (दखलपात्र) / भाषा आणि जीवन / ४:४ / दिवाळी १९८६.

पुंडे द. दि. / कवितेचे अध्यापन / आलोचना / २४:१२ / ऑगस्ट १९८६.

बेल डॅनियल / पुस्तके कशासाठी ? (दखलपात्र) / भाषा आणि जीवन / ४ : ४ / दिवाळी १९८६

भाटे सरोजा / वाक्यपदीय ऑफ भर्तृहरी (परीक्षण) / संपादक व भाषांतर : के. ए. सुब्रह्मण्यम् अय्यर / आलोचना / २४ : ७ / मार्च १९८६.

भावे अवंती / खाटिक (विलास सारंग) – काव्यास्वाद / कवितारती / १ : ५ / जुलै–ऑगस्ट १९८६

भावे अवंती / त्याला नाही कदर (ना. घ. देशपांडे) – काव्यास्वाद / कवितारती / १: २ / जानेवारी–फेब्रुवारी १९८६

भावे अवंती / वेडी ( विंदा करंदीकर )– काव्यस्वाद / कवितारती / १ : ४ / मे-जून १९८६.

भावे अवंती / शोध ( इंदिरा संत )– काव्यास्वाद / कवितारती / १ : ३ / मार्च-एप्रिल १९८६.

भिडे वसुधा / गंगागत्रीच्या निमित्ताने (भाषा निरीक्षण) / भाषा आणि जीवन / ४ : २ / उन्हाळा १९८६.

मराठे सुधाकर / खंडणी की मातृदक्षिणा ? ( ज्याची त्याची प्रचीती ) / भाषा आणि जीवन ४ : ३ / पावसाळा १९८६.

महापात्र जयंत / अंतर्यामीचा अनोळखी : पटवून घ्यायचं कवितेमधून ( ज्याची त्याची प्रचीती ) / भाषा आणि जीवन /४ : ४ / दिवाळी १९८६.

मुंडले आशा / अनवट विषयाचे क्षितिज ( पुस्तक परीक्षण ) / परीक्षित ग्रंथ-सांकेतिक आणि गुप्त भाषा : परंपरा व स्वरूप. ले. : प्रभाकर मांडे / भाषा आणि जीवन / ४ :३ / पावसाळा १९८६.

मोहिते शरदिनी / व्यक्तिमत्त्व...शब्दांचे ! ( ज्याची त्याची प्रचीती ) / भाषा आणि जीवन / ४ :२ / उन्हाळा १९८६.

रसाळ सुधीर / करंदीकरांची कविता : वेडी : एक भाष्य / कवितारती / १:६ / सप्टेंबर–ऑक्टोबर १९८६.

वनारसे श्यामला / आणि काही भाषिक कौटुंबिक कोडी : भाषेतील बदल, बायकांच्या बाबतीत ( दखलपात्र ) / भाषा आणि जीवन / ४ : २ / उन्हाळा १९८६.

श्याम विमल / भाषा पूर्वी की जीवन पूर्वी ? ( शंका आणि समाधान ) / भाषा आणि जीवन / ४ :२ / उन्हाळा १९८६.

सच्चिदानंद कु. ( मलयाळम कवी ) / कविता अनुवाद म्हणजे (वसा आंतरभारतीचा)/ अनुवादक–अशोक रा. केळकर / भाषा आणि जीवन / ४ : ३ / पावसाळा १९८६.

सोनावणे शाम / नजरेला पडलेले पत्र ( साद आणि प्रतिसाद ) / भाषा आणि जीवन / ४ : २ / उन्हाळा १९८६.

सोमण अंजली /...आणखी एक ओसरते माध्यम ( संपादकीय ) / भाषा आणि जीवन ४ : ४ / दिवाळी १९८६.

सोमण अंजली / व्याख्यानं आणि वृत्तपत्र ( संपादकीय ) / भाषा आणि जीवन / ४ : ३ पावसाळा १९८६.

सोमण अंजली / व्याख्यान : संज्ञापनाचं कालबाह्य माध्यम ( संपादकीय ) / भाषा आणि जीवन / ४ : २ / उन्हाळा १९८६.

सोमण अंजली / शब्द हवा आहे ‘ गटस् ’साठी ( शंका आणि समाधान) / भाषा आणि जीवन / ४ : २ / उन्हाळा १९८६.

## मराठीतील भाषाविषयक लेखन १९८१–१९८५

'भाषा आणि जीवन' पत्रिकेत वरील वर्षातील भाषाविषयक लेखनाची सूची येऊन गेल्या आहेत. त्यानंतर निदर्शनास आलेल्या लेखनाची सूची पुढे देत आहोत.

**१९८१.**

आचार्य मा. ना. I मराठी व्याकरण : काही समस्या ( दुसरी आवृत्ती )– ले. प्र. ना. दीक्षित / परीक्षण / आलोचना १९८१.

मेहेंदळे म. अ. / राज्यभाषेतर माध्यमाच्या शाळा असाव्यात का ? / सकाळ पुणे / १९८१. ०८. १९.

वाळंबे मो. रा. / मराठी शुद्धलेखनप्रदीप / गो. य. राणे प्रकाशन, पुणे / १९८१, (परीक्षण : मा. ना. आचार्य, सत्यकथा जुलै १९८२ )

हातकणंगलेकर, म. द. ( संपादक ) / वाङ्मयीन शैली आणि तंत्र. / अभिजात प्रकाशन, कोल्हापूर / १९८१

( विलिंग्डन महाविद्यालय, सांगली येथील ९–११ जून १९७८ मध्ये झालेल्या परिसंवादातील निबंधांचे संकलन )

**१९८२.**

आचार्य मा. ना. / मराठी शुद्धलेखन प्रदीप- ले. मो. रा. वाळंबे / परीक्षण / सत्यकथा / जुलै १९८२.

**१९८३.**

जोशी ना. ग. / मराठी भाषेचे मूळ : एक प्रतिक्रिया / मराठी संशोधन पत्रिका / ३१ : १ ऑक्टो–नो–डिसें. १९८३.

देव विजया / दृष्टान्तपाठातील गद्याचा वर्णनात्मक अभ्यास / मराठी संशोधन पत्रिका / ३१ : १ / ऑक्टो–नो–डिसें. १९८३.

धोंगडे रमेश / अर्वाचीन मराठी / महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळासाठी कॉन्टिनेन्टल प्रकाशन / पुणे १९८३.

भिडे वसुधा / चित्पावनी : मराठीची एक बोली / मराठी संशोधन पत्रिका / ३१ : १ / ऑक्टो–नो–डिसें. १९८३.

लद्दू सुहासिनी / मराठीच्या प्रमाण भाषेचे स्वरूप / महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळासाठी कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे / १९८३.

**१९८४.**

अर्जुनवाडकर कृष्ण श्री. / मराठी वर्णमालेतील आनुपूर्वी / मराठी संशोधन पत्रिका ३१ : २ / जाने–फे–मार्च १९८४.

अर्जुनवाडकर कृष्ण श्री. / कोशगत व्याकरण / मराठी संशोधन पत्रिका / ३१ : ४ /

जुलै–ऑ–सप्टेंबर–१९८४.

काळे कल्याण आणि पुंडे द. दि. / व्यावहारिक मराठी / निराली प्रकाशन पुणे / १९८४

खैरे विश्वनाथ / 'मराठी भाषेचे मूळ' आणि 'संमत' / मराठी संशोधन पत्रिका / ३१ : ३ / एप्रिल–मे–जून १९८४.

चिटणीस विजया / खानदेशी : एक स्थानिक अभ्यास / प्रेस्टिज प्रकाशन, पुणे / १९८४.

दीक्षित प्र. ना. / मराठी व्याकरणाचे मूलाधार / (अप्रकाशित) पी एच्. डी. प्रबंध / पुणे विद्यापीठ / १९८४.

परांजपे कु. रा. / भारतीय लिप्यांची तात्त्विक एकात्मता (एक तुलनात्मक अभ्यास) / मराठी संशोधन पत्रिका / ३१ : ४ / जुलै-ऑ-सप्टेंबर १९८४.

भांडारे वसंत वैजनाथ / पाणिनीकालीन समास आणि मराठी भाषेतील जोडशब्दांची जडणघडण / मराठी संशोधन पत्रिका / ३१ : २ / जाने-फे-मार्च १९८४.

**१९८५.**

कुलकर्णी व. दा./ अर्थ निर्णय शास्त्र आणि महानुभावीय भाष्यपद्धती / संशोधनाची क्षितिजे (डॉ. वि. भि कोलते : अमृतमहोत्सव गौरवग्रंथ)/अमेय प्रकाशन, नागपूर/ जून १९८५.

जाधव वसंत मा. / अनुवादाच्या संदर्भात / नवभारत / ऑक्टो–नोव्हें. १९८५.

जोगळेकर द. ज. / वैज्ञानिक परिभाषा / युगवाणी / ४१ : ७–८ / जुलै–ऑगस्ट १९८५.

झाडे सी. मो. / संस्कृतभाषा सुलभ पण विद्यार्थी उदासीन, असे का ? / शिक्षणसमीक्षा / १९ : ३ / ऑक्टो–नोव्हें १९८५.

देशपांडे ग. त्र्यं.: / "दैवीवाक्" स्वरूप, सामर्थ्य, प्रयोजन / संशोधनाची क्षितिजे (डॉ. वि. भि. कोलते अमृतमहोत्सव गौरवग्रंथ) / अमेय प्रकाशन, नागपूर / जून १९८५.

नसिराबादकर ल. रा. / व्यावहारिक मराठी / फडके बुकसेलर्स, कोल्हापूर / १९८५.

नेमाडे भालचंद्र / भाषांतर मीमांसेचे स्वरूप / संशोधनाची क्षितिजे (डॉ. वि. भि. कोलते अमृतमहोत्सव गौरवग्रंथ) / अमेय प्रकाशन, नागपूर / जून १९८५.

पाटील न. ब. / भाषा, लोकभाषा आणि परिभाषा / संशोधनाची क्षितिजे (डॉ. वि. भि. कोलते अमृतमहोत्सव गौरवग्रंथ) / अमेय प्रकाशन, नागपूर / जून १९८५.

भागवत श्री. वा. / आपल्या लेखनविषयक समस्या / संशोधनाची क्षितिजे (डॉ. वि. भि. कोलते अमृतमहोत्सव गौरवग्रंथ) अमेय प्रकाशन, नागपूर / जून १९८५.

भावे अवंती /एकटा माझ्याचसाठी (बा. भ. बोरकर) / काव्यास्वाद / कवितारती /

१ : १ / नोव्हें–डिसें. १९८५.
भावे स. शि. / भाषा, साहित्य आणि कविता / कवितारती / १ : १ / नोव्हें- डिसें. १९८५.
मंगरूळकर अरविंद / मराठी प्रयोजक–प्रयोगाचा विचार / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे / मे १९८५.
लेले वा. के. / संभाषणाची वैशिष्टये / युगवाणी / ४१ : १–२ / जाने–फेब्रु. १९८५.

## मराठीविषयक अन्य भाषांमधील लेखन : १९८१–१९८५

Arokianathan, S. / Being a bilingual and becoming a monolingual / ISDL working papers in applied linguistics / 1 : 1. 1– 15 Jan. 1985. (The study of Tamil Marathi bilinguals of Thanjavur with the prospect of a possible merger into the Tamil–speaking dominant community. )
Arokianathan, S. / Bilinguatism : A case study of Tamil –Marathi bilinguals in Thanjavur / Tamil university, Tanjavur / 1983
Bhide S. S. / Kinship terms and social practices / Bulletin of the Deccan college Researh Institute / 40 / 1981.
Bhide Vasudha / Descriptive study of Chitpavani : A Dialect of Marathi / University of Poona Ph. D. dissertation ( unpublished) / 1982.
Dasgupta Probal; Dhongde, R. V.; Rajendran, S. / On complement verb reparsing in Bangla, Marathi and Tamil / Indian linguistics / 42 / 1981.
Deshpande Prakash Madhav / Hypothesis concerning the aspectual nature of the passive as a language universal with special reference to English and Marathi Passives / University of Poona Ph. D. dissertation ( unpublished ) 1984.
Dhongde, R. V. / A Tagmemic analysis of Marathi Sentence Patterns / Research Journal of the S. N. D. T. Womens' University / 1981.
Dhongde, R. V / Dictionary of Marathi Synonyms : Methodological Problems / Bulletin of the Deccan College Research Institute / 43 / 1984.
Dhongde, R. V. / Error Analysis and the child 's acquisition of the first language / Indian Linguisties / 43 / 1982.
Dhongde, R. V. / Marathi as a medium of instruction in higher




अनुक्रमणिका

education / Bulletin of the Deccan College Research Institute / 42 / 1983.

Dhongde, R. V. / Verbs of pre-cooking Processes in Marathi/ Bulletin of the Deccan College Research Institute / 41 / 1982.

Junghare, Indira Y. / Markers of definiteness in Indo-Aryan / Proceedings of the ninth Annual Meeting of the Berkeley Linguistic Society Berkeley / CA : Berkeley Linguistic Society, University of California / 1983. ( Hindi, Marathi and Bengali examined )

Junghare, Indira Y. / Topic Prominence : An Areal linguistic feature. / Papers from the Tenth Minnesota Regional conference on Language and Linguistics / Minneapolis, MN: University of Minnesota / 1984. Marathi, Hindi, Telugu, Kannada Malayalam, Tamil compared

Junghare, Indira Y. / Topic Prominence and zero-NP anaphora in Indo-Aryan / Paper Presented at the Seventh Annual Minnesota Regional conference on language and linguistics/Minneapolis, M N : University of Minnesota / 1981.
( To be reprinted in : Egdar C. Polome Festschrift / Marathi and Hindi examined.)

Kelkar Ashok R. / Marathi Institute / Letters Indian Express/ 1984.04.09,

Kelkar Ashok R. / Marathi Script and Spelling reform movements / Caltis – 83 / Pune : Organising Committee of caltis – 83 Seminar / 1983.

**तारतम्य**

मे १९६८ मध्ये पॅरिसमध्ये विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांनी विद्यापीठाची जुनाट शिक्षण-पद्धती, जुनाट पाठ्यक्रम, आणि जाचक निर्बंध यांच्या विरुद्ध बंड केले आणि हळूहळू त्याची परिणती द गोल यांच्या राजवटीविरुद्धच्या राजकीय उठावात झाली. प्रसिद्ध विचारवंत सार्त्र विद्यार्थ्यांच्या बाजूने या लढाईत उतरले आहेत हे कळवण्यासाठी अधिकारी राष्ट्राध्यक्ष द गोल यांच्याकडे गेले. त्यावर द गोल शांतपणे म्हणाले :

‘ एखाद्या व्होल्तेरला कधी अटक करीत नसतात. ’





अनुक्रमणिका

## पत्रिकेबद्दलचे वार्षिक निवेदन

' मराठी अभ्यास परिषद पत्रिका ' या नियतकालिकाची मालकी आणि इतर बाबी यांच्यासंबंधी निवेदन (वृत्तपत्रे आणि पुस्तके नोंदणी अधिनियम, कलम १९ डी (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४ यांना अनुसरून फेब्रुवारी संपल्यानंतर प्रकाशित झालेल्या पहिल्या अंकात द्यायचे असते ते निवेदन.)

१. प्रकाशन स्थळ : पुणे, महाराष्ट्र.

२. प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक : जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर महिन्यात.

३. मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : प्रभाकर नारायण परांजपे; भारतीय; चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, १/८ आगरकर नगर, पुणे ४११००१.

४. मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.

५. प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : प्रभाकर नारायण परांजपे; भारतीय; चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, १/८ आगरकर नगर, पुणे ४११००१.

६. संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : अशोक रामचंद्र केळकर; भारतीय; ए-२ परिमल, १२३९- ए आपटे रस्ता, पुणे ४११००४.

७. पत्रिकेच्या मालकाचे नाव, पत्ता, एकंदर भांडवलाच्या एक टक्क्याहून अधिक हिश्शाचे भागीदार किंवा भागधारक, त्यांचे पत्ते : मराठी अभ्यास परिषद, १/८ आगरकर नगर, पुणे ४११००१.

मी प्रभाकर नारायण परांजपे, असे प्रतिज्ञापूर्वक सांगतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

प्रभाकर नारायण परांजपे

पुणे १ एप्रिल १९८७ प्रकाशक

## टपालहशिलाबद्दल थोडेसे

पत्रिकेचा अंक टपालाने पाठविताना त्याला पुरेसे टपालहशील लावलेले असते. नोंदणी झालेल्या नियतकालिकांना ५०० ग्रॅम वजनापर्यंतचे टपालहशील ३० पैसे आहे. परंतु काही टपालकचेऱ्या साध्या पुस्तकडाकेसाठी (बुकपोस्ट) असलेले किमान टपालहशील ५० पैसे पत्रिकेच्या अंकावर लावलेले नाही या कारणास्तव दंड आकारणी करतात. ही त्या त्या टपालकचेऱ्यांची चूक आहे. टपालकचेरीला ही चूक समजावून सांगावी किंवा अंक परत करावा. पुण्याच्या मुख्य टपालकचेरीतर्फे योग्य त्या टपाल-खात्याच्या सूचनेसह तो अंक आपल्याकडे परत पाठविण्याची व्यवस्था केली जाईल. टपालखात्याच्या चुकीमुळे वाचकांना भूर्दंड पडू नये ही व्यवस्थापनाची इच्छा आहे.

## पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. मनीऑर्डरने किंवा चेकने पैसे पाठविल्यास चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास तसा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत २ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. सध्यातरी त्यांची आकारणी वर्गणीच्याच दरात करण्यात येते. ती पुढीलप्रमाणे :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ३० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ४० रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो की मागील वर्षांपैकी असो) १० रु.

मागील अंक मागवताना वर्ष १ (१९८३) मध्ये फक्त दोन अंक निघाले, वर्ष २ (१९८४) पासून मात्र दर वर्षाला चार अंक निघाले हे लक्षात घ्यावे.

## परिषदेची वर्गणी

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ १५ रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ३० रु. + १५ रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी २०० रु. (परदेशी अंक पाठवायचा असल्यास शिवाय १०० रु.); देणगीदारासाठी ५०० रु. किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी १००० रु. किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

